


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



सुप्रसिद्ध साहित्यिक
आणि
साहित्य परिषदेचे माजी कार्याध्यक्ष



श्री. ज. जोशी
( निधन : १३ जानेवारी १९८९ )

यांना विनम्र श्रद्धांजली

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २४८ – जानेवारी–मार्च १९८९

( म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत )

## १९८८ : साहित्य विशेषांक

**संपादक : शंकर सारडा**

संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर,
डॉ. वीणा देव, डॉ. वसंत सावंत
प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १० रुपये**
वार्षिक वर्गणी ( संस्थांसाठी : ४० रुपये )

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक–प्रकाशक : श्री. राजा फडणीस कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ : साप्ताहिक मुद्रण, १०२५ सदाशिव, पुणे ४११ ०३०

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

## काव्य



## चरित्र–आत्मचरित्र



## इतर



श्री. पुराणिक यांचे छायाचित्र : एम्. डी. शिंदे यांच्या सहकार्याने

महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९८७ साली साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना हाती घेतली होती. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यप्रेमी जनतेने साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता व्यक्त करावी, असे आवाहन वेळोवेळी करण्यात आले होते. या आवाहनाला साहित्यप्रेमी संस्था आणि व्यक्ती यांनी, तसेच साहित्य परिषदेच्या सभासदांनी उत्तम प्रतिसाद दिल्यामुळे ३० जून १९८८ पर्यंत एक लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमा झालेला आहे. हा निधी जमविण्यास ज्या साहित्यप्रेमी रसिकांनी हातभार लावला त्यांचे आम्ही अतिशय आभारी आहोत.

जमलेल्या निधीच्या अंतरिम व्याजातून दि. २७ मे १९८८ रोजी झालेल्या साहित्य परिषदेच्या ८२ व्या वर्धापनदिन समारंभात, वयोवृद्ध साहित्यिक डॉ. वा. भा. पाठक यांना रु. ५०००/– आणि अहमदनगरचे तरुण कथालेखक श्री. अशोक थोरे यांना वैद्यकीय मदतीसाठी रु. १०००/– असे मानधन देण्यात येऊन, या निधीच्या प्रत्यक्ष कार्यवाहीस आरंभ करण्यात आला आहे, हे जाहीर करताना आनंद होतो.

दर वर्षी अधिकाधिक साहित्यिकांना जास्तीत जास्त मानधन देता यावे यासाठी किमान पाच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे. हा संकल्प शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्यासाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल. देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

| | | |
|---|---|---|
| **म. श्री. दीक्षित**<br>कोषाध्यक्ष | **राजेंद्र बनहट्टी**<br>कार्याध्यक्ष | **ग. प्र. प्रधान**<br>अध्यक्ष |
| **गं. ना. जोगळेकर**<br>कार्यवाह | **राजा फडणीस**<br>कार्यवाह | **चिं. शं. जोशी**<br>कार्यवाह |



अनुक्रमणिका

# संपादकीय

मित्रहो,

अमरावती येथे भरणाऱ्या साहित्य संमेलनाच्या प्रसंगी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या ह्या अंकाचे प्रकाशन करण्याचा योग आला याबद्दल आनंद वाटतो.

१९८८ मधील मराठी पुस्तकांवर लक्ष केंद्रित करावे ह्या दृष्टीने या अंकाची आखणी करण्यात आली आहे. जुलैमध्ये सुमारे ७० लेखक–समीक्षकांना पत्रे लिहून १९८८ मधील आपल्याला आवडणाऱ्या वा लक्षणीय वाटलेल्या एका पुस्तकाबद्दल डिसेंबर अखेरपर्यंत मजकूर पाठवावा असे आवाहन केले होते. सर्वसामान्य वाचकांनीही आपल्या आवडीच्या पुस्तकावर लिहून पाठवावे म्हणून एक स्पर्धा जाहीर केली. या दोन्ही मार्गांनी सुमारे सत्तर पुस्तकांवरील मजकूर हाती आला. अंकाच्या पृष्ठसंख्येच्या मर्यादेत त्यांपैकी पस्तीस पुस्तकांवरील परीक्षणे बसली; त्यांनी हा अंक सिद्ध झाला आहे. बरीच महत्त्वाची पुस्तके यात येऊ शकली नाहीत याची जाणीव आहे; परंतु पत्रिकेसाठी जी आर्थिक तरतूद आहे ती लक्षात घेता यापेक्षा मोठा व अधिक पृष्ठसंख्येचा अंक काढता येणार नसल्यामुळे नाईलाज आहे. यापेक्षा दुप्पट मोठा अंक काढला तरीही सर्वच महत्त्वाच्या पुस्तकांचा परामर्श घेणे शक्य होईल असे नाही. परीक्षणे मोजक्याच पुस्तकांची देणे क्रमप्राप्त ठरल्याने, इतर महत्त्वाच्या पुस्तकांची कल्पना यावी म्हणून अनिल बळेल यांचा लेखही मुद्दाम देत आहोत. शिवाय ८८ मधील पुस्तकांची यादीही जोडली आहे. स्थूलमानाने १९८८ मधील लक्षवेधक मराठी पुस्तकांची माहिती या अंकामुळे वाचकवर्गाला झाली तरी आमचे प्रयत्न कारणी लागले असे म्हणता येईल. ( काही उरलेली परीक्षणे पुढच्या अंकात देण्याचा मानस आहेच. )

झोंबी, अमुकचं स्वातंत्र्य ही पुस्तके ८७ च्या शेवटी आलेली असली तरी ८८ मध्ये पारितोषिक मिळवणारी; म्हणून त्यांच्यावरील मजकूर दिला आहे.

कोणालाही अमुक एका पुस्तकावरच लिहा असे कळवलेले नव्हते. त्यामुळे काही पुस्तकांवर एकापेक्षा अधिक परीक्षणे आली; तर काही महत्त्वाच्या पुस्तकांवर कोणाचाच मजकूर आला नाही. ' रँडम सर्व्हे ' सारखा हा एक प्रयोग आहे. असे असतानाही ८८ मधील लक्षवेधक अशा बऱ्याच पुस्तकांची निवड यात सहजगत्या झाली आहे हेही नमूद करण्यासारखे आहे.



अनुक्रमणिका

१९८९ मधील पुस्तकांचा परामर्श घेणारा असाच अंक जानेवारी–फेब्रुवारी ९० मध्ये काढण्यात येईल. लेखक–वाचक मित्रांनी त्या दृष्टीने आतापासूनच लक्ष द्यावे अशी विनंती आहे. ८९ मध्ये बाजारात येणारी पुस्तके चाळून चांगल्या पुस्तकांवर त्या त्या वेळीच लिहून ठेवावे.

## साहित्य संमेलनाध्यक्षांचे अभिनंदन

अमरावती साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी सुप्रसिद्ध कथाकार शांताराम ( के. ज. पुरोहित ) यांची निवड झाली. अत्यंत चुरशीच्या या निवडणुकीत आपले प्रमुख प्रतिस्पर्धी विद्याधर गोखले यांच्यापेक्षा फक्त एकच जादा मत मिळून शांताराम निवडून आले. खरोखरच त्यांचे भाग्य जोरदार आहे. आम्ही त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. अमरावतीचे संमेलन ते आपल्या कुशल हाताळणीने आणि मृदुमधुर वाणीने सुरळीत पार पाडूनही गाजवतील अशी खात्री वाटते. ( त्यांच्याविषयी स्वतंत्र लेख या अंकात दिला आहे. )

## ‘उचल्या’ चे अभिनंदन

लक्ष्मण गायकवाड यांच्या ‘उचल्या’ या पहिल्याच आत्मकथनात्मक पुस्तकाची निवड साहित्य अकादमीने करून, मराठीतील ८७ मधील हे सर्वोत्कृष्ट पुस्तक ठरवले आहे. जे कोणी परीक्षक महानुभाव होते त्यांचेही त्याबद्दल गायकवाड यांच्या जोडीने अभिनंदन करायला हवे. गायकवाड हे उचल्या या गुन्हेगार जमातीतील एक तरुण; अर्ध्यातच शिक्षण सोडावे लागले तरी समाजपरिवर्तनाच्या चळवळीकडे आकृष्ट होऊन, आपल्या समाजाच्या संघटनेसाठी प्रयत्नशील बनले. आपल्या समाजात लहान मुलांनाही अट्टल चोऱ्या करण्याचे आणि पोलिसांनी कितीही छळ केला तरी तोंडातून अवाक्षरही न काढण्याचे प्रशिक्षण कसे दिले जाते; याचे मोठे शहारे आणणारे चित्र त्यांनी रंगवले आहे. भुकेल्या पोटासाठी त्यांना जे काही करावे लागते त्याचे तपशीलही मध्यमवर्गीय संवेदनांना हादरा देणारे आहेत. ( एकदा पोटात आग पडली तेव्हा मी जात्यावरचे पाळू उचलून वरी मीठ टाकून जातं चाटू चाटू खाल्लो. ) हे पुस्तक हा एक सामाजिक दस्तऐवज आहे. वाङ्‌मयीन रूढ निकष याला लावण्याचा आग्रह नसावा. प्रा. हातकणंगलेकर यांनी सकाळमध्ये दिनांक ५–१–८९ रोजी लिहिलेल्या लेखातील विचार पटण्यासारखे आहेत. ‘दलित आत्मवृत्त माहितीच्या आणि वृत्तीच्या दृष्टीने जेवढे निखळ तेवढे ते आजच्या संदर्भात सरस असे मानले पाहिजे. या निकषावर... अनेक ठळक पुस्तके आठवतात. त्यांची अकादमी पातळीवर दखल घेतली जाऊ नये याचा खेद वाटतो.’ आभरान, गबाळ, जिणे आमुचे वगैरे आत्मवृत्तेही प्रकाशात व पारितोपिकात यावयास पाहिजेत असे म्हणून प्रा. हातकणंगलेकर पुस्ती जोडतात : ‘शेवटी

पारितोषिकासाठी लेखनाची गुणवत्ता जशी आवश्यक ठरते तशी पारितोषिके निश्चित करण्याऱ्या प्रक्रियेतील अनेक अनुकूल घटकांचे आणि संदर्भांचे कामही निर्णायक ठरते. प्रत्येक पुस्तकाच्या बाबतीत सर्वमान्य निर्णय असणार नाही हे स्पष्ट आहे.'

लक्ष्मण गायकवाड यांच्या हातून पुढेही चांगले लेखन घडत राहो; त्यांना असेच मानसन्मान मिळत राहोत.

## व. पु. काळे यांना भावे पुरस्कार

मेनका प्रकाशनतर्फे देण्यात येणारा पु. भा. भावे पुरस्कार यंदा विख्यात कथाकार व. पु. काळे यांना देण्यात आला. १४०० वर कथाकथनाचे प्रयोग करून त्यांनी विक्रम केला आहे. ककची क (कथाकथनाची कथा) हे त्यांचे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. कथाकथन कलेचे स्वानुभवाधिष्ठित तंत्रमंत्र त्यात त्यांनी प्रकट केले आहे. भावे पुरस्काराबद्दल त्यांचे अभिनंदन.

## इंदिरा संत

आपल्या गर्भरेशमी काव्याने रसिकांना मोहविणाऱ्या इंदिरा संतांनी ४-१-८९ रोजी ७५ व्या वर्षात पदार्पण केले. एका मुलाखतीत त्यांनी म्हटले की आता मुलांसाठी कविता करण्याची हौस जागी झाली आहे. उत्तम बालगीते त्यामुळे मराठी मुलांना मिळतील अशी खात्री वाटते. त्यांना शुभेच्छा.

## वि. कृ. श्रोत्रिय

वेदांतील गोष्टी, दशकुमारचरित, पळवलेला पोर वगैरे पुस्तकांचे लेखक वि. कृ. श्रोत्रिय यांनी १ जानेवारी ८९ रोजी ८० व्या वर्षात पदार्पण केले. आचार्य अत्रे यांच्या प्रेरणेने कँप एज्युकेशन सोसायटीत अध्यापक म्हणून त्यांनी प्रवेश केला. आणि त्या शाळेचे दीर्घकाळ मुख्याध्यापक म्हणूनही काम केले. संस्कृतचा व्यासंग वाढवून वेदांतील गोष्टी सुबोधपणे सांगणारे त्यांचे पुस्तक केशव भिकाजी ढवळे यांनी काढले. गेली पन्नास वर्षे ते बालकुमार वाचकांना प्रिय आहे. स्वतःची प्रकाशन संस्था काढून त्यांनी मुलांसाठी गोष्टी व नाटिका प्रसिद्ध केल्या. गाजलेल्या इंग्रजी पुस्तकांची रसाळ मराठी रूपांतरे केली, महाभारतातील कथांचीही नव्या दृष्टिकोणातून मांडणी केली. नुकतेच संस्कृत सुभाषितांचा परिचय करून देणारे त्यांचे पुस्तक बाजारात आले आहे. सकाळमध्ये त्यांनी अनेक वर्षे शब्दकथा लिहिल्या. आज ऐंशी वर्षे वय असतानाही सकाळमध्ये बातमीत वा लेखांत चुकीचे शब्दप्रयोग आले तर ते जागरूकपणे त्याबद्दल पत्र लिहून नेमका शब्द सुचवतात मराठी भाषेच्या शुद्ध स्वरूपाची जाणीव करून देणारे असे अधिकारवाणीने

बोलणारे जाणकार हवेतच. श्री. श्रोत्रिय यांना हे काम करण्यास दीर्घ आयुरारोग्य लाभो ही प्रार्थना.

## प्रकाश मोहाडीकर

साने गुरुजी कथामालेचे जनक व संवर्धक प्रकाश मोहाडीकर यांनी ९ जानेवारी रोजी ७१ व्या वर्षात पदार्पण केले. मुंबईला त्यांनी साने गुरुजी विद्यालय स्थापन केले. साने गुरुजींचा संदेश सर्वदूर नेण्यासाठी प्रयत्नशील असणारे प्रकाशभाई उत्तम वक्ते, कुशल संघटक आणि जिद्दीचे कार्यकर्ते आहेत. त्यांना भावी जीवन सुखसमृद्धीचे जावो ही प्रार्थना.

## प्रभाकर ऊर्ध्वरेषे

सुप्रसिद्ध मार्क्सवादी समीक्षक प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांनी ९ जानेवारी रोजी ७१ व्या वर्षात पदार्पण केले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ते ब्रह्मदेशात होते. रंगूनवर बाँबहल्ला वगैरे त्यांचे लेख गाजले होते. किर्लोस्करमध्ये १९४२ पासून ते विपुल लेखन करीत. कम्युनिस्ट पक्षाने काढलेल्या मराठी दैनिकाचे व साप्ताहिकाचे संपादनही ते करीत. कम्युनिझमला इतिहासाचे आव्हान हा ५७ साली लिहिलेला लेख वास्तववादी आणि रोखठोक विश्लेषण करणारा होता. आश्चर्य म्हणजे गेली ५० वर्षे सतत लेखन करीत असूनही आजवर त्यांचे एकही पुस्तक छापले गेलेले नाही. आता 'लवकरच हरवलेले दिवस' हे त्यांचे आत्मचरित्र मौजतर्फे प्रसिद्ध होत आहे. त्यांना आमच्या शुभेच्छा.

## औदुंबर साहित्य संमेलन

औदुंबर जिल्हा सांगली येथे कविवर्य सुधांशु हे दरवर्षी १४ जानेवारीला सदानंद साहित्य मंडळातर्फे साहित्य संमेलन भरवत असतात. यंदाचे ४६ वे संमेलन कवयित्री अनुराधा पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाले. एका छोटया गावात अशा प्रकारचा वाङ्मयीन उपक्रम सातत्याने चालत राहावा ही खरोखर अभिमानाची बाब आहे. कविवर्य सुधांशु हे सत्तरीत असूनही या संमेलनाचे आयोजन तरुणांनाही लाजवणाऱ्या उत्साहाने करीत असतात. अशी साहित्य संमेलने जागोजाग भरण्याची परंपरा निर्माण झाली तर वाचकांच्या अभिरुचीच्या अभिवृद्धीला मोठीच चालना मिळेल.

## द. म. साहित्य संमेलन

दैनिक पुढारीच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त कोल्हापूर येथे द. म. सा. संमेलन दि. ४ फेब्रुवारी रोजी भरणार आहे. उद्घाटन पुढारीचे संपादक प्रतापसिंह जाधव

हे करणार आहेत. या संमेलनाला आम्ही सुयश चिंतितो.

## लेखनस्वातंत्र्य आणि हितसंबंधितांची दडपणे

लेखन स्वातंत्र्यावर आघात करणाऱ्या काही घटनांवर मागच्या अंकात प्रकाश टाकला होता. बदनामी विधेयक, सॅटॉनिक व्हर्सेसवरील बंदी यामुळे पुनरुज्जीवनवादी शक्ती आणि शासकीय धोरण हे लेखनस्वातंत्र्यावर अंकुश ठेवण्यास कसे उत्सुक आहेत याची कल्पना येते. 'सोबत'मधील बाळ गांगल यांच्या एका लेखात महात्मा फुले यांच्या संदर्भात अनुदार उद्‌गार काढले गेले. त्यावरून खूपच काहूर माजले. सोबतकार ग. वा. बेहरे आणि बाळ गांगल यांच्यावर सरकारने खटले भरले. विधानसभेत त्यावर चर्चा झाली. अनेक ठिकाणी निषेध सभा झाल्या. कोल्हापूरला तर बंदही पाळण्यात आला. मार्क्सवादी हिंदी नाटककार हाशमी यांची पथनाटय करीत असताना साहिबाबाद येथे राजकीय प्रतिस्पर्ध्यांकडून हत्या केली गेली. त्यामुळेही देशभर पुरोगामी विचाराच्या मंडळींनी आपला आवाज उठवला. आपले सरकार, आपले नेते आणि आपले एकूणच जनमानस हे फार हळुवार, संवेदनाक्षम बनत चाललेले आहे आणि लहानसहान मतभेदही ते सहन करू शकत नाही. विचाराला विचाराने उत्तर देण्याऐवजी आंदोलने वा हत्या अशा मार्गांकडे वळत आहे. हे वळण विचार–स्वातंत्र्याला व लेखनस्वातंत्र्याला बाधक ठरणारे आहे. आपल्याला पटेल तोच विचार जे मांडतील तेच आम्हांला हवेत. आमच्यापेक्षा वेगळे विचार मांडतील ते आम्हाला चालणार नाहीत, अशी आपली भूमिका प्रत्येकानेच आग्रहाने मांडली तर लोकशाहीला काही अधिष्ठानच उरणार नाही. वेगवेगळे विचार–वाद असणारच. कोणी ते सौम्यपणे मांडील, कोणी भडकपणे. परंतु त्यांना तशाच वैचारिक–तात्त्विक पातळीवर उत्तर देण्याऐवजी निषेध–बंद–आंदोलने यांचा मार्ग चोखाळण्याचीच चाल पडली तर ती गोष्ट अनर्थसूचक ठरेल. कुठल्याही गोष्टीला भडक राजकीय रूप देणाऱ्या हितसंबंधी लोकांच्या जाळयात सर्व समाज सहजी सापडत राहिला तर लोकशाहीचा पायाच डळमळीत होईल. तसे होता कामा नये.

**शंकर सारडा**
संपादक

# श्रद्धांजली

## उमाशंकर जोशी

ज्ञानपीठ पारितोषिक विजेते गुजराती कवी उमाशंकर जोशी यांचे १९ डिसेंबर १९८८ रोजी निधन झाले. ते ७८ वर्षांचे होते. गेल्याच वर्षी पुण्याला नानासाहेब गोरे यांच्या ऐंशीव्या वाढदिवसाच्या गौरव समारंभाला ते आले होते. त्यांची छोटी सडसडीत मूर्ती पाहून त्यांच्या वयाचा अंदाज येत नसे. अत्यंत मृदू वाणी आणि सौहार्दशील स्वभाव यामुळे उमाशंकरजी भारतीय साहित्यकार बनले. संस्कृती हे त्रैमासिक त्यांनी दीर्घकाळ चालवून गुजराती वाचकांना विश्ववाङ्मयाचे जाणकार बनवले. १९६७ साली त्यांना निशीथ या काव्यसंग्रहाबद्दल ज्ञानपीठ पुरस्कार मिळाला. त्या रकमेचा गंगोत्री ट्रस्ट करून त्याद्वारे भारतीय भाषांतील काव्यसंग्रहांचे गुजराती अनुवाद प्रसिद्ध करण्याची महत्त्वाकांक्षी योजना त्यांनी राबवली. गुजरात विद्यापीठाचे कुलगुरू, साहित्य अकादमीचे अध्यक्ष, राज्यसभा सदस्य असे अनेक मानसन्मान त्यांना मिळाले. १९५० सालापासून त्यांचा–माझा परिचय होता. मुंबई विद्यापीठात १९६१ साली त्यांनी दिलेल्या तीन व्याख्यानांचे मराठी रूपांतर मी साधनेसाठी केले होते. (एकाच रात्रीपुरते त्यांचे टंकलिखित मला उपलब्ध झाले. पुस्तकाची छापील तीस पृष्ठे होतील एवढा मजकूर रात्रभर जागून भाषांतरित केला. त्याची आठवण त्यांनी आपण होऊन मला गेल्या वर्षी पुण्यातल्या त्यांच्या भेटीत दिली तेव्हा मला अर्थातच आनंद वाटला.) मध्यंतरी दिल्लीत एकदा गाठ पडली असताना, मी जुनी ओळख देऊ लागलो. तेव्हा ते मला एकदम थांबवून म्हणाले, 'थांब. तुझं नाव मला सांगू नकोस. मी बरोबर सांगतो की नाही बघ.' कधी काळी भेटणाऱ्या व्यक्तींबाबतही ते किती आस्था बाळगत याची कल्पना यावी म्हणून थोडासा आत्मश्लाघेचा दोष पत्करूनही हा प्रसंग येथे नमूद केला आहे. उमाशंकरजींना मराठी चांगले समजे. ते मराठी उत्तम बोलत. मराठीत भाषणेही करीत. एक सात्त्विक ज्ञानतपस्वी आणि प्रेमळ साहित्यकार म्हणून त्यांचे स्मरण दीर्घकाल होत राहील.

## जैनेंद्रकुमार

हिंदी भाषेतील नामवंत कादंबरीकार जैनेंद्रकुमार यांचे २४ डिसेंबरला वयाच्या ८३ व्या वर्षी निधन झाले. परख, सुनीता, मुक्तिबोध वगैरे त्यांच्या



अनुक्रमणिका

कादंबऱ्या गेली पन्नास वर्षे हिंदी भाषेत बेस्ट सेलर राहिलेल्या आहेत. ज्ञानपीठ पुरस्कारही त्यांना मिळाला. राष्ट्रीय–आंतरराष्ट्रीय वाङ्मयीन परिसंवादात त्यांचा नेहमी वावर असे. (माझी व त्यांची ओळख १९६० साली दिल्लीला झालेल्या टाल्स्टॉय सेमिनारच्या वेळी झाली होती. दिल्लीतील माझ्या वास्तव्यात त्यांच्याशी अधूनमधून गाठीभेटी होत. मराठी वाङ्मयाबद्दल त्यांना आस्था होती. अनेक मराठी लेखकांबद्दल ते आवर्जून विचारीत.)

## गं. बा. सरदार

मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष व सुप्रसिद्ध परिवर्तनवादी विचारवंत प्रा. गं. बा. सरदार यांचे वयाच्या ८१ व्या वर्षी निधन झाले. त्यांच्या निधनाने परिवर्तनवादी चळवळीत काम करणाऱ्या तरुण कार्यकर्त्यांना आपुलकीने मार्गदर्शन करणारा आधारवडच जणू कोसळला.

## श्री. ज. जोशी

साहित्य परिषदेचे माजी कार्याध्यक्ष, आणि मराठीतील एक नामवंत साहित्यिक श्री. श्री. ज. जोशी यांचे दिनांक १३ जानेवारी ८९ रोजी हृदयविकाराने वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी निधन झाले. जोशीबुवांची 'वृत्तान्त'ही जोशी घराण्याचा वेळणेश्वर शाखेचा दीडशे वर्षांचा कुलवृत्तांत सांगणारी कादंबरी चार महिन्यांपूर्वीच प्रसिद्ध झाली होती. सकाळमधले त्यांचे 'भरती ओहोटी' हे सदरही लोकप्रिय होते. म. सा. पत्रिकेच्या दिवाळी अंकातही त्यांनी आमच्या आवाहनाला मान देऊन तत्परतेने लेख पाठवला होता. शेवटपर्यंत त्यांचे लेखन जोरदारपणे चाललेले होते. त्यामुळे त्यांचा आठ–दहा दिवसांचा अल्प आजार असा प्राणघातक ठरेल अशी कल्पनाही नव्हती. त्यांच्या मिस्किल–प्रांजल व्यक्तित्वाची गैरहजेरी दीर्घकाळ जाणवत राहील.

## दिनकर साक्रीकर

साप्ताहिक क्लॅरिटी व पूर्वा मासिक यांचे संपादक व समाजवादी कार्यकर्ते दिनकर साक्रीकर यांचे १ जानेवारी १९८९ रोजी वयाच्या ७२ व्या वर्षी दुःखद निधन झाले. १९४० साली विद्यार्थिदशेतच स्वातंत्र्य आंदोलनात त्यांनी स्वतःला झोकून दिले चले जाव, संयुक्त महाराष्ट्र आंदोलन, गोवा मुक्तिसंग्राम यात भाग घेऊन कारावास पत्करला. त्यांच्या प्रथम पत्नी इंदूताई यांच्या अकाली निधनानंतर त्यांनी बरीच वर्षे इंदूताई साक्रीकर कथास्पर्धांचे आयोजन केले. डॉ. राममनोहर लोहियांचे ते जवळचे मित्र होते. त्यांच्या निधनाने एक साक्षेपी संपादक हरपला. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखात आम्ही सहभागी आहोत.



अनुक्रमणिका

## चंद्रकांत काकोडकर

. मराठीतील एक वाचकप्रिय कादंबरीकार चंद्रकांत काकोडकर यांचे नोव्हेंबर-मध्ये देहावसान झाले. शंभरावर कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या; चंद्रकांत या दिवाळी अंकाचेही संपादन ते करीत. त्यांच्या श्यामा या कादंबरीवर सरकारने अश्लीलता-विरोधी कायद्याखाली खटला भरला होता. परंतु हायकोर्टापर्यंत लढत देऊन त्यांनी तो खटला जिंकला. शरदबाबूंच्या धर्तीवरच्या बंगाली पार्श्वभूमीवरील कादंबऱ्या लिहिण्यातही त्यांची हातोटी होती. सर्वसामान्य मराठी वाचकाची वाचनाची गोडी कायम राहावी या दृष्टीने साधेसोपे पण नाट्यपूर्ण, कौटुंबिक हृदयस्पर्शी कथानक रंगवणे त्यांना आवडे.

या सर्वांना आमची विनम्र श्रद्धांजली.

— संपादक







# संमेलनाध्यक्ष शांताराम

## व्यक्तिमत्त्वाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकणारी मुलाखत

**शंकर सारडा**

पुरुषस्य भाग्यं कधी उजळेल याचा नेम नाही. यंदाच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षस्थानी प्राचार्य के. ज. पुरोहित उर्फ कथाकार शांताराम यांची एका मताने निवड झाली; आणि प्रसिद्धीचा झोत त्यांजवर एकदम केंद्रित झाला. तसे शांताराम १९४० पासून लेखन करीत आहेत; त्यांची पहिली कथा प्रसिद्ध झाली तिलाही ४५ वर्षे उलटली. चौदा कथासंग्रह, एक लघुनिबंधसंग्रह, काही इंग्लिश लेख त्यांच्या लेखनकर्तृत्वाची साक्ष देण्यासाठी सज्ज आहेत. परंतु नवकथेच्या जमान्यात गाडगीळ, गोखले, भावे, माडगूळकर यांच्या बरोबरीने कथालेखन करूनही शांताराम काहीसे बाजूलाच पडले. न्यूयॉर्क हेरॉल्ड, ट्रिब्यूनच्या कथास्पर्धेत त्यांना बक्षीस मिळालेही. मराठीतील अनेक कथाकारांची निर्मिती विपुल असूनही समीक्षकांकडून ते डावलले गेले. ते का डावलले गेले याची कारणे अनेक असतील; आणि प्रत्ये-काच्या बाबतीत ती वेगवेगळीही असतील. त्याचमुळे कधी कुणाच्या अध्यातमध्यात न जाता किंवा स्वतःचे पीठ निर्माण करण्यात रस न घेणाऱ्या केशवराव जगन्नाथ पुरोहितांनी अमरावती, मुंबई येथे इंग्रजी वाङ्मयाचे प्राध्यापक व प्राचार्य म्हणून काम करून तब्येतीत कथालेखन केले; मानमान्यतेचा हव्यास न बाळगता जे पदरी पडले ते आनंदाने स्वीकारून ते नावाप्रमाणेच शांत राहिले. साहजिकच यंदाच्या संमेलनाच्या अध्यक्षीय स्पर्धेत ते उतरले हे एक आश्चर्य; आणि केवळ एका मता-धिक्याने निवडून आले हे दुसरे आश्चर्य. त्यांचे भाग्यच बलवत्तर. शिरवा वगैरे हे शांताराम यांचे कथासंग्रह मी कॉलेजमध्ये असताना वाचले होते; परंतु ते तसे मानाचा ठाव त्यावेळी घेऊ शकले नव्हते. नंतरच्या काळातही त्यांच्या कथांकडे फारसे लक्ष गेले नाही. एकदम खळबळ उडवून देणारी ही कथा नव्हती. चौदा कथासंग्रह असले तरी आज त्यांपैकी बरेचसे वाचनालयातही मिळत नाहीत; बाजारात मिळणे दुष्करच ! डॉ. रा. भा. पाटणकरांचे त्यांच्या कथांवरचे समीक्षा-त्मक पुस्तक; विलास खोले यांनी संपादित केलेले निवडक शांताराम हे पुस्तक— ह्यावरून शांताराम यांचे प्रसिद्धी कीर्तीबाबतचे ग्रह पालटले आहेत असेच म्हणा-यला हवे.

त्यांची पत्रिकेसाठी नुकतीच मुलाखत घेतली. त्यातील काही प्रश्नोत्तरे.



अनुक्रमणिका

## पहिली कथा भेदरेखा

'तुमची पहिली कथा कुठली ? ती का लिहावीशी वाटली ?'

'माझी पहिली कथा भेदरेखा सह्याद्री मासिकात प्रसिद्ध झाली. एका आदिवासी जमातीत घडलेला एक प्रसंग मी पाहिला. चर्चेपेक्षा तो कथेच्याच रूपात मला भिडला. पाश्चात्त्य समाज आणि आदिवासी यांच्यातील नृत्ये, गाणी, स्त्रीपुरुष संबंधातील मोकळेपणा यांत वरवरचे साम्य असले तरी त्या दोघांची नीतिमत्तेबाबतची धारणा निरनिराळी आहे ही जाणीव त्या प्रसंगाने झाली. हे या कथेच्या जन्माचे कारण. एक इंग्रज साहेब गोंड तरुणीबरोबर नृत्य करतो. तिचे कौतुक होते. पण त्या तरुणीचे लग्न होते. त्यानंतर तो गोरा साहेब तिच्याशी लगट करू पाहतो तेव्हा त्याचा खून होतो. दोन समाजांतील नीतिमूल्यांतील भेदाची या प्रसंगामुळे एकदम जाणीव झाली. कथारूपात ती प्रकट झाली.'

## चित्रपट–सृष्टीचे आकर्षण

'या कथेपूर्वी आपण समीक्षणात्मक लेखन केले होते असे वाचले. खरे का ?'

'हो. ना. मी मॅट्रिकला होतो तेव्हा. १९४० मध्ये सह्याद्रीत कवी अनिल यांच्या मुक्तछंदावर हल्ला करणारा कडक लेख लिहिला. मॅट्रिकचा निकालही लागलेला नव्हता. त्यामुळे आपल्या खऱ्या नावाने तो लेख प्रसिद्ध करायची भीती वाटत होती. घरी मला शांताराम म्हणत. म्हणून मी शांताराम या टोपण नावाने तो लेख प्रसिद्ध केला. धनुर्धारीत जी. श्याम या नावाने चित्रपटांवरही लिहिले. काही काळ बाँबे टॉकीजमध्ये चित्रपटाची कथा लिहिण्याच्या कामावरही होतो. परंतु चित्रपटसृष्टीतील एकूण बेभरवशाची स्थिती लक्षात आल्यावर कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. त्या दरम्यान चार–सहा कथा प्रसिद्ध झाल्या होत्या. कॉलेजमध्येही आधी सायन्स साइड घेतली, परंतु दुसऱ्या टर्मला आर्टस्कडे गेलो. बी. ए. ला नागपूर विद्यापीठात मराठीचे सुवर्णपदक मिळवले. एम्. ए. लाही इंग्रजीत प्रथम श्रेणीत आलो.'

'प्राध्यापकच व्हायचे असा मनोदय त्यावेळी होता का ?'

'नाही. मला वृत्तपत्रात काम करायचे होते. तरुण भारतचे संपादक ग. त्र्यं. माडखोलकर यांना मी भेटलो. त्यांनी या क्षेत्रात पगार फार कमी असतो असे सांगून मला त्या विचारापासून परावृत्त केले. पंजाबराव देशमुखांनी प्राध्यापक हो असा सल्ला दिला. मी नागपूरच्या सायन्स कॉलेजमध्ये नोकरी धरली. पुढे अमरावतीला विदर्भ महाविद्यालयात १९ वर्षे होतो. तेथून मुंबईला इस्माईल युसूफ कॉलेजमध्ये बदली झाली. पुढे प्राचार्य झालो.'

## दहा आवडत्या कथा

'पंचेचाळीस वर्षांत तुमच्या सुमारे २०० कथा प्रसिद्ध झाल्या. चौदा संग्रह निघाले. त्यांतील तुमच्या आवडीच्या दहा कथा निवडायला सांगितल्या तर सांगता येतील ?'

'हो. घ्या लिहून. खार, शिंग, शिरवा, वाघ, चंद्र माझा सखा, उद्रेक, परागंदा, देवाचे शेत, जमिनीवरची माणसे, वाढवेळ.'

'यांतील सर्वांत जास्त आवडती अशी एकच कथा निवडा म्हटले तर ?'

'तर खार असे मी उत्तर देईन.'

## कथाकारांची उपेक्षा

'मराठीतील अनेक चांगले कथाकार हे त्यामानाने उपेक्षित राहिले. शं. ना. नवरे, दि. बा. मोकाशी, वि. शं. पारगावकर,. श्री. ज. जोशी, मधु मंगेश कर्णिक इ. किती तरी नावे सांगता येतील. तुमच्या कथांकडेही दुर्लक्षच झाले. असे का झाले असावे ? याचा दोष कुणाकडे जातो ?'

'दुर्लक्षच झाले हे खरे आहे. परंतु आता ही परिस्थिती बदलत आहे. डॉ. पाटणकरांचे माझ्या कथालेखनाचे विश्लेषण करणारे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. विद्यापीठात एम फिल, पीएच्. डी. च्या संशोधनासाठी माझ्या कथांचा अभ्यास चालू आहे. कथाकारांवरील समीक्षात्मक ग्रंथ छापणे हे न परवडणारे काम आहे. गंभीर समीक्षालेखन प्रसिद्ध करणारी मासिके– जर्नल्सही आपल्याकडे नाहीत. त्यामुळे अनेक कथाकार उपेक्षित राहिले खरे. ही स्थिती पालटते आहे असे वाटते.'

'मराठी कथाकारांत सर्वांत कोण मोठा वाटतो ?'

'जी ए. कुलकर्णी हेच श्रेष्ठ आहेत.'

'नवीन कथाकारांपैकी तुम्हाला विशेष आवडणारे कोण कोण आहेत ?'

'भारत सासणे, आशा बगे, रंगनाथ पठारे, राजेंद्र बनहट्टी, विलास सारंग अशी काही नावे सांगता येतील. या प्रत्येकाचे लेखन वेगळ्या प्रकारचे आहे. त्या वेगवेगळ्या कारणांमुळे ते आवडतात.'

'आपले महाविद्यालयीन अभ्यासक्रम हे जुनाट आणि कालबाह्य आहेत; प्राध्यापकवर्गही नव्या लेखनाला उत्साहाने सामोरा जाण्यास अनुत्सुक आढळतो. त्यामुळे नव्या लेखककवींच्या आकलन–आस्वादाच्या मार्गात मोठाच अडथळा येतो असे म्हटले तर ?'

'ते काही चूक ठरणार नाही. विद्यापीठात शिकवताना विशिष्ट वादाच्या वा विशिष्ट भूमिकेच्या चष्म्यातून वाङ्मयाकडे पाहण्यात येते. त्यामुळे विद्यार्थ्याला



अनुक्रमणिका

वाङ्मयाची गोडी लागत नाही. कॉलेजमधील खालच्या वर्गांना सर्वसमावेशक दृष्टीने वाङ्मयाचे दर्शन घडवायला हवे. तसे आज होत नाही. आज विद्यार्थीही उदासीन दिसतो. धंद्याचे शिक्षण सोडले तर बाकीचे शिक्षण व जीवन यांचा संबंधच उरलेला नाही.'

## पाश्चात्त्य वाङ्मयाचा प्रभाव

'तुम्ही इंग्रजीचे प्राध्यापक. इंग्लिश कथांच्या वाचनाचा तुमच्या कथा-लेखनावर काही परिणाम झाला असे तुम्हाला वाटते का ?'

'माझ्या कथांवर रशियन मॉडेल्सचा प्रभाव थोडाफार आहे. तिकडच्या सामाजिक जीवनप्रणालीतील आणि दृष्टीतील उदारता माझ्याही कथांमध्ये आली आहे. गोगोलची बारीक तपशीलवार चित्रणाची ढब माझ्यात आली आहे; आणि कॅथरिन मॅन्सफिल्डचा पसरटपणा–मोकळेपणाही मला भावतो. दोस्तोवेस्की, चेकॉव्ह, हेमिंग्वे, वॅलेस स्टीव्हन्स, कॅथरिन मॅन्सफिल्ड यांचे लेखन मला विशेष आवडते. परंतु माझ्या कथांतील जे जीवन आहे ते या भूमीतले आहे. मी शेतकरी कुटुंबात वाढलो. एकत्र कुटुंबात वाढलो. माणसांचा गोतावळा, त्यातील रागलोभ, हेवेदावे, यांचे मला आकर्षण आहे. हे सगळे मला हवेहवेसे वाटते. या जुन्या कुटुंब-पद्धतीत माणसामाणसांत एक घट्ट जवळीक असे. तुटकपणा नसे. त्यामुळे मला अशा सरंजामशाही वातावरणाची ओढ आहे. माझ्या कथेची मुळं देशीपणात घट्ट रुजलेली आहेत.'.

'तंत्रदृष्टया तुम्ही वेगळे काही प्रयोग केले आहेत का ?'

'तंत्रदृष्टया मी कथा खूप मोकळी केली असे मला वाटते. हे करीत असताना नवीन साचा निर्माण होऊ नये असाही माझा कटाक्ष होता. सूक्ष्मता आणि सामाजिकता या दोन परस्परविरुद्ध वाटणाऱ्या गोष्टी मी काही कथांमध्ये तरी चांगल्या प्रकारे एकत्र आणल्या असे मला वाटते.'

## कथालेखन : वेळ व पद्धत

'तुमच्या कथालेखनाची पद्धत कशी असते ? सलग एका बैठकीत कथा लिहून होते ?'

'नाही. मी सुरुवातीला फार अडखळतो. कथेचा पहिला अर्धा भाग थांबत थांबत लिहीत रहातो. तो मनासारखा जमायला फार वेळ लागतो. परंतु अर्धा-अधिक भाग झाला की उरलेला भाग मात्र एका बैठकीत पूर्ण होऊ शकतो. पूर्वी मी कथांचे पुनर्लेखन करीत असे. आता फारसे करावे लागत नाही.

(पान १०७ पहा)

# मेड इन इंडिया : पुरुषोत्तम बोरकर

## ग्रामीण त्रिशंकू तरुणवर्गाचे प्रातिनिधिक चित्र

**आशा मुंडले**

मला सर्वांत आवडलेल्या पुस्तकाचे नाव ' मेड इन इंडिया.'

या पुस्तकाच्या नावात आणि भाषेत एक सहज साधा ताजेपणा आहे. ग्रामीण शेतकऱ्यांची वऱ्हाडी बोली, अर्धशिक्षितांनी आत्मसात केलेली नागरी शैलीतली ठरीव वाक्यं आणि इंग्लिश–हिंदी शब्द यांचे जे अफलातून मिश्रण नायक कथनासाठी वापरतो ते अतिशय वास्तववादी आहे. आजच्या अर्धशिक्षित ग्रामीण तरुणाचा–थोडयावहुत सुखवस्तू तरुणाचा–संज्ञाप्रवाह कसा भेसळीचा आहे ते बोरकरांनी भाषेत नेमकं पकडलंय. मुखपृष्ठावरचे चित्र किंचित बुजगावण्यासारखे आहे ही गोष्टही मार्मिक आहे. प्रवास करताना असे तरुण रेल्वेत सहज भेटतात, वऱ्हाडात आणि इतरत्रही. या वर्गाचे समर्थ चित्रण यापूर्वी मराठीत झाले नव्हते. फार तर ' टिंगल ' किंवा ' अडचण ' या सुरात त्यांचा उल्लेख केला गेला आहे. पण क्षितिज हरवलेले हे तरुण आजच्या वास्तवाचा प्रमुख भाग आहेत हे लेखकाला जाणवले ही त्याची ताकद.

' आव ' आणून ' संस्कृती 'च्या गप्पा मारणाऱ्यांची झोप उडावी असे हे रोखठोक पुस्तक आहे. त्याला आत्मकथनाचा फॉर्म वापरला असला तरी ती प्रातिनिधिक स्वरूपाची कादंबरी आहे. कापसाच्या ढिगाऱ्यात खेळणारे मूल गुदमरून गेल्याचा प्रसंग, स्वतःच्या फिल्लम प्टाईल प्रेमाची गोष्ट, वडलानी अद्दल घडवण्याकरता हस्तांदोलन करून उखडलेला सरकारी डॉक्टरचा हात असे अनेक ' किस्से ' निराळ्या बोलीत, निराळ्या ग्रामीण भागात ऐकलेले आठवतात. निळू फुलेने जशी पडद्यावर साखरसम्राटांची एक जबरजस्त प्रतिमा निर्माण केली तशीच जिवंत प्रतिमा. यातला नायक फक्त शब्दांच्या साह्याने ' सरपंच बुढ्ढयाची ' प्रतिमा उभी करतो. बुढ्ढा डोळ्यांसमोर खडा राहातो.

बुढ्ढयाची महत्त्वाकांक्षा हा परिच्छेद तर अप्रतिम आहे. ' त भाऊ पंज्याब, सरपंच तर तुमी आज ना उद्या झालेच. मंग येक कुलांटी मारून चक्क झेळपीत... बुढ्ढ्याची येकशेयेक टक्के संगमरवरी समाधी ठेवलेच आहे यमुनातिरी.' (पान ६) बोरकरांची राजकीय जाण दाहक आहे.

पुस्तक आवडण्याचे आणखी एक कारण म्हणजे त्याचा अस्सल देशी वाण.



अनुक्रमणिका

अर्थात हे कारण तसे नकारात्मक आहे. पण हल्ली ऋण मान्य न करता केलेली उधारउसनवारी–परदेशातून किंवा चक्क आपापसांतसुद्धा–इतक्या वेळा वाचनात दाढेखाली अटकते की स्वतःच्या मनाने लिहिणारा प्रामाणिक लेखक भेटला की फक्त त्यासाठी काही गुण राखून ठेवावेसे वाटतात. वास्तविक हे कारण ठरण्याची वेळ आली नसती तर मला बरे वाटले असते. ललित लेखन का करावेसे वाटते याची कुठलीही थिअरी घेतली तरी त्यात 'चोरी' बसतच नाही. 'इकडून तिकडून आणलेली' पुस्तके प्रकाशितच होऊ नयेत असे माझे एक स्वप्न आहे. पण ते असो.

या पुस्तकातला विनोद सूक्ष्म आणि मार्मिक आहे. आणि तो आशयाच्या अंतरंगाशी संबंधित आहे. तोंडी लावण्यासारखा 'फेकलेला' नाही. कधी मिस्किल, कधी उपरोधिक, कधी उपहासात्मक असा विविध प्रकारचा आहे आणि शाब्दिक नसून आर्थिक आहे.

'कोसला' कारांचे 'कारे' प्राध्यापक या सरपंचाच्या मुलापेक्षा जास्त शिकलेले पण मातीत कमी रुजलेले आहेत. या फरकाची तुलना वाचतावाचता अभावितपणे मनात येऊन गेली. वाचताना असं दुसरं गुणवान पुस्तक सहज आठवणं हे मला तरी पुस्तकाच्या गुणवत्तेचं लक्षण वाटतं. खरं म्हणजे ही प्राध्यापक मंडळी जरीला आणि विढारमध्ये आहेत पण 'कोसलात्रयी' असंच मी त्यांना मनातल्या मनात म्हणते. बोरकरांचा नायक अजिबात 'पांढरपेशा' नाही. आणि 'आक्रोश' करणारा वंचितही नाही. या 'नवीन'पणामुळेही पुस्तकामुळे मिळालेल्या आनंदात भर पडली.

आखीव, बांधेसूद आणि केवळ पाने वाढवण्याकरता विस्तार न करता वेळीच थांबण्याचा संयम हाही या पुस्तकाचा मोठा गुण असे मला तरी वाटले.

या पुस्तकाने मला अंतर्मुख केले कारण ते अगदी समकालीन आहे. शहरात बसून केलेल्या 'ग्रामीण हुकमी' कल्पना त्यात नाहीत. 'पण लक्षात कोण घेतो' आता वाचली तर निर्भेळ कलात्मक आनंद घेता येतो. कारण वाचकांच्या सुदैवाने आता काळ बदलला. यमुना आता आसपास भेटणार नाही. पण ताजी 'दलित' आत्मचरित्रे किंवा ललितकृती वाचताना असे अलिप्तपण ठेवताच येत नाही. भोवताली असे चाललेय याच्या अपराधीपणाचे ओझे मनावर येते. तशी पुस्तके ही कलाकृतीपेक्षा वृत्तान्त अधिक असतात. उदाहरणार्थ, 'अक्करमाशी' किंवा 'नाच ग घुमा'.

'मेड इन इंडिया' मात्र त्या पलीकडे जाऊन ललितकृतीचा आनंद देते. उपरोध, विनोद आणि निवेदनातला सर्वस्पर्शीपणा यामुळे एका माणसापेक्षा एका समूहाचे दर्शन होते. अपराधीपणा संपतो आणि 'अति झालं आणि हसू आलं' असं या परमपूज्य देशाबद्दल वाटायला लागतं. यातली ट्रॅजिकॉमेडी निव्वळ परि-

स्थितीची किंवा बाह्य संकटांची नाही. एखाद्याच्याच वाट्याला येणाऱ्या योगा-योगांचीही नाही.

ती ' भारतीय ' माणसाचीच आहे. आयुष्याकडे पाहाण्याच्या त्याच्या एकंदर ' तयारी 'तून आलेली. पुस्तकाच्या शेवटी अत्यंत तरल, काव्यमय हिरव्यागार शेतजमिनीच्या वर्णनातून नायकाने जमिनीत रुजणे स्वीकारल्याचे दाखवले आहे. पण नायकाचा तो एक ' मूड ' असावा. ते वर्णन खूप आवडले तरीही वाटले की हा ' मूड ' आयुष्यभर सस्टेन होणे कठीणच. पण त्यातून लेखक हा जाणीवपूर्वक प्रयत्नवादी आणि आशावादी असावा याचा मात्र प्रत्यय आला आणि तेही मला सुखद वाटले. कारण मला स्वतःला ' सिनिकल ' किंवा ' राजा मरो, राणी सती जावो, मला काय त्याचे ' अशा प्रकारची कोरड्या वृत्तीची पुस्तके आवडत नाहीत. किंवहुना तटस्थ लेखन नसतेच. लेखकाची मूल्ये त्यातून दिसतातच. आणि ललित कृतीचा विचार करताना आशयमूल्यांचा विचार करू नये असं मला वाटत नाही. सुबक कारागिरी असलेले एखादे लोकप्रिय पुस्तकही त्यामुळे मला नावडू शकते. इथे मला उदाहरणे देण्याचा खूपच मोह होतो. पण तो आवरते.

एखादे पुस्तक आवडताना त्याची काही कारणे पुस्तकाच्या अंगभूत गुणात असतात, काही स्वतःच्या अभिरुचीत आणि त्यापूर्वी केलेल्या वाचनात असतात आणि काही पुस्तक आणि वास्तव यांच्या अन्योन्य संबंधात असतात. हे तिन्ही पैलू या पुस्तकाबाबत आहेतच.

लेखकाचे ग्रामीण जीवनाचे निरीक्षण सूक्ष्म तर आहेच पण सर्व स्तरांवरचे आहे. एखादीच विशिष्ट ' जात ' किंवा ' वर्ग ' किंवा ' पिढी ' यापेक्षा त्याला अधिक परिमाणे आहेत. त्यामुळे हे दर्शन सखोल झाले आहे. धार्मिक रुढी, राजकीय जीवन, आर्थिक गुंतागुंत या सर्वांचीच जाण त्यातून भेदकपणे दिसते. त्या चित्रणात बटबटीतपणा अजिबात नाही. उलट तपशिलाची सूक्ष्मता आहे.

आमचा हीरो हा प्रच्छन्न व्हिलन नाही. पण स्वतःचीच कोंडी करू शकणारा मात्र आहे. निरनिराळ्या जीवनतत्त्वज्ञानांचा कमी-अधिक आणि असमतोल परिणाम ( उर्फ संस्कार ) झाल्यामुळे अनेकभंगी व्यक्तिमत्त्व झालेला आजचा तरुण त्रिशंकू पुरुष त्यातून दिसतो. ( दुभंग किंवा त्रिभंग व्यक्तिमत्त्व त्यामानाने फारच कमी गुंतागुंतीचे. )

या कादंबरीत स्त्रियांचे समर्थ चित्रण नाही. पण हे मी आक्षेप म्हणून सांगत नाही. स्त्रिया ' टाईपकास्ट ' आहेत यांचे कारण अजूनही नायकाचा व त्यांचा संपर्क टाईप्डच आहे. किंबहुना त्याच्या कोंडीचाच तोही एक भाग आहे. उदाहरणार्थ तो मेल्यावर काय होईल याच्या कल्पनाचित्रात बायको नुसती रडणाऱ्यांपैकी एक आहे पण आई भडाभडा दुःख बोलून दाखवते आहे तेसुद्धा ' कालच तो पुरणपोळी मागत होता ' असे. ( पान १५० )



अनुक्रमणिका

बोरकरांनी ग्रामीण जीवनाचे उदात्तीकरणही केलेले नाही आणि 'तुच्छी-करण 'ही केलेले नाही. पण खेड्यातला मटका, गावठी राजकारण, शिक्षण, धार्मिक जखडलेपणा, या सर्वांचा कॅलिडिओस्कोप उभा केला आहे. समजणारा समजेल अशा प्रकारे.

पुस्तक वाचून आणि आधीची लेखकाच्या मित्रांची नावे वाचून हे सहज जाणवते की 'नायक' हा लेखक नाही. त्यातल्या 'मी' पेक्षा त्यांचा आवाका जास्त आहे म्हणूनच हा 'मी' ते रंगवू शकले. आजची स्थिती त्यांना खटकतेय पण एकेकटा त्या परिस्थितीपुढे हतबल ठरतो ही कटू जाण त्यांना आहे. त्यांच्या पुढच्या पुस्तकाची मी उत्सुकतेने वाट पाहाते आहे.

(मेड इन इंडिया : पुरुषोत्तम बोरकर, श्रीविद्या प्रकाशन, पंचेचाळीस रुपये)

---

# पानिपत : विश्वास पाटील

## एक भव्य साक्षात्कार

**डॉ. द. ता. भोसले**

पानितपतचे तिसरे युद्ध हा मराठी माणसाचा जिव्हाळयाचा विषय. मराठ्यांच्या इतिहासाला कलाटणी देणारा विषय. त्यामुळेच तो कधीही शिळा न होणारा विषय. या विषयावर आतापर्यंत वैद्यांच्या 'दुर्दैवी रंगू' कादंबरीपासून अनेकांनी ललितलेखन केलेले आहे. श्री. विश्वास पाटील यांची 'पानिपत' ही नुकतीच प्रसिद्ध झालेली कादंबरी म्हणजे पानिपतच्या युद्धावरील एक तटस्थ पण कलात्मक भाष्य म्हणता येईल. या विषयाचा एक नवा शोध, वेध आणि बोध घेण्याचा लेखकाने येथे यशस्वी प्रयत्न केलेला आहे.

एखाद्या ऐतिहासिक घटनेवर जेव्हा साहित्यकृती निर्माण केली जाते; तेव्हा ती साहित्यकृती तीन गोष्टींची अपेक्षा करीत असते. अशा साहित्यकृतीत ऐति-हासिक सत्याचे कलात्मक सत्यात रूपांतर झालेले असावे लागते. मूळ इतिहासदत्त सत्याला धक्का न लावता त्याचा आविष्कार झालेला असावा. आणि त्या काळाचा युगधर्म आविष्कृत झालेला प्रत्ययाला यावा लागतो. या तिन्ही गोष्टींची परिपूर्ती या कादंबरीत उत्तम रीतीने झालेली आहे. सुमारे आठशे पानांच्या या बहुपेडी कादंबरीत पहिल्या भागात काही ठिकाणी एकजीव न झालेली माहिती आलेली असली तरी बाकीच्या संपूर्ण कादंबरीमध्ये ऐतिहासिक सत्याला कलात्मक रूप

देण्यासाठी आवश्यक असलेले कल्पनाजन्य सर्जन, तपशिलाचा कलापूर्ण वापर, व्यक्तिरेखेची पुर्नर्निमिती आणि ऐतिहासिक कालखंडाचा प्रत्यय आणून देणारी भाषा यांच्या आधारे आपली कादंबरी निर्दोष व परिपूर्ण करण्याचा लेखकाने प्रयत्न केलेला आहे. ऐतिहासिक सत्याचे सखोल नि सर्वस्पर्शी चिंतन आणि त्याद्वारे घड-णारा नवा साक्षात्कार याबाबतीत ती थोडीशी उणावली आहे असे ओझरते जाण-वून जाते. पण तरीही एक भव्य पट उलगडून दाखविण्यासाठी लेखकाने घेतलेले परिश्रम, केलेला व्यासंग आणि स्वीकारलेली भूमिका कौतुकास्पद आहे.

पानिपत युद्धात मराठ्यांचा जो दारूण पराभव झाला आणि मोठी प्राण-हानी झाली त्याची उकल लेखकाने अधिक चांगल्या रीतीने करून दाखविली आहे. इतिहासग्रंथात आणि बखरींमध्ये याची कारणमीमांसा आलेली असली तरी परा-भवाचा, भाऊंच्या अहंकारी, हट्टाग्रही, तापट व अविवेकी स्वभावावर खूपसा भर देण्यात आलेला असतो. या बखरीत भाऊंचे स्वभावचित्रण यापेक्षा पूर्णत: वेगळे रेखाटले आहे. आपण समजतो इतका पोरकट स्वभाव आणि अहंकारी वृत्ती त्यांच्या ठिकाणी नव्हती हे दाखवून ते एक विचारी, समंजस, मुत्सद्दी, पराक्रमी आणि काही मूल्यांवर अढळ निष्ठा ठेवणारे समृद्ध व्यक्तिमत्त्व होते, हे लेखकाने अनेक प्रसंगांच्या आधारे दाखवून दिले आहे. अन् अशा या व्यक्तिमत्त्वाला वाङ्मयीन-दृष्टया सजीव व चित्रमयही बनविले आहे. संपूर्ण कादंबरीवर भाऊंच्या व्यक्ति-मत्त्वाची प्रभा उमटविण्यात लेखकाला यश आलेले आहे. पण अलीकडे ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्ये जी एक ऐतिहासिक व्यक्तीची वकिली करण्याची भूमिका जाणवते, त्या व्यक्तीचे मुद्दाम समर्थन केले जाते, तशी एकांगी भूमिका मात्र येथे स्वीकार-लेली नाही. त्यामुळे एका समृद्ध आणि मूल्यप्रेमी व्यक्तिमत्त्वाचा सजीव आविष्कार या ठिकाणी झाल्याने कादंबरीची महत्ता वाढलेली जाणवते.

पानिपतच्या पराभवाला एकटा भाऊ जबाबदार नाही, तर अनेकविध गोष्टींचा परिपाक होऊन तो पराभव घडला याचे उत्तम व कलात्मक दर्शन येथे घडविले आहे. यात्रेकरू आणि बाजारबुणग्यांची अफाट संख्या; युद्धमोहिमेला छेद देणारे त्यांचे हेतू; त्यासाठी जेरेशास्त्री व इतरांनी धरलेला आग्रह, होळकरांची स्वार्थी चाल; मराठा सरदारांतील परस्पर वैर; इब्राहिम व समशेरबद्दल त्यांचा असलेला आकस, बळवंतराव मेहेंदळयांनी मनात अढी ठेवून केलेले वर्तन, युद्धापूर्वी पडलेला भीषण दुष्काळ; अब्दालीस तयारीसाठी मिळालेला वेळ; ऐनवेळी त्याला मिळालेली कुमक; विश्वासरावांचा अकल्पित झालेला मृत्यू; त्यातून उत्पन्न झालेली हतबलता; नानासाहेबांचा दक्षिणेतून आलेला खलिता व वेळेवर न आलेली मदत; होळकरांनी ऐनवेळी घेतलेली युद्धातून माघार; पानिपतचा सपाट भूप्रदेश; मोक्याच्या वेळी तोडलेला कालवा; लढताना आढळणारा एकीचा अभाव, अफवां-वर ठेवलेला विश्वास; नजीबला वारंवार मिळालेले जीवदान; ऐनवेळी सुटलेला

व मराठ्यांना प्रतिकूल ठरलेला वारा अशा अनेक ज्ञात व अज्ञात कारणांची उकल येथे केलेली आहे. ही उकल करीत असताना आपण केवळ इतिहास-लेखन करीत नाही तर ऐतिहासिक कलाकृती निर्माण करीत आहोत याचे भान लेखकाने ठेवलेले आहे. या साऱ्या गोष्टींचे कलात्मक, परस्पर सुसंगत आणि तितकेच तटस्थ चित्रण करून या दारूण पराभवाचे नानाविध पदर कसे परस्परात गुंतलेले होते, याची एक संमिश्र जाणीव आपल्या मनात साकार होईल याची काळजी विश्वास पाटील यांनी घेतलेली आहे त्यामुळे या प्रसंगाचे चित्र गडद, व्यामिश्र आणि बहुपरिणामी होण्यास मदत झालेली आहे. त्यामुळेच जीवनाचा आणि मानवी स्वभावाचा भव्य साक्षात्कार आपल्या मनाला अंतर्मुख करून जातो.

पानिपतचे युद्ध म्हणजे शोकात्मिकेची सगळी बीजे असलेला नाट्यमय आणि धगधगता अनुभव होय. पानिपत युद्धातून उत्पन्न झालेल्या शोकात्मिकेचे विलक्षण दर्शन या कादंबरीत घडते. त्यात ही शोकात्मिका केवळ एकपदरी स्वरूपात चित्रित केलेली नाही. सखोल परिणाम करणारी शोकात्मिका ही व्यक्तिनिष्ठ, परिस्थिति-जन्य आणि तितकीच नियतिजन्य प्रकारची असते. या तिन्ही घटकांचे पदर कमीअधिक प्रमाणात त्यात एकरूप होऊन शोकात्मिका घडवीत असतात. पानिपत युद्धातून साकार झालेल्या शोकात्मिकेत हे तिन्ही घटक उत्तम रीतीने एकजीव झालेले दाखविले आहेत. एकट्या भाऊमुळे, एकट्या विपरीत परिस्थितीमुळे वा नियतीच्या प्रभावामुळे ही शोकात्मिका घडलेली नाही, हे दाखविण्यात लेखकाला यश आलेले आहे. त्यामुळे तिची परिणामकारकता वाढलेली आहे.

या कादंबरीत छोट्या-मोठ्या पात्रांची खूप गर्दी झालेली असली तरी त्यातील प्रधान पात्रांचे चित्रण जिवंत आणि प्रत्ययकारी झालेले आहे. विशेषतः नजीब, जाट, होळकर, पार्वतीबाई, नानासाहेब, विश्वासराव यांचे स्वभावचित्रण अधिक प्रत्ययकारी झालेले आहे. गंगोबातात्या, विंचुरकर सरदार, जनकोजी शिंदे, अब्दाली यांच्याही स्वभावचित्रणात चांगले रंग भरलेले आढळतात. ऐतिहासिक वातावरणाचा प्रत्यय देणारी भाषा; अर्थवाही व मार्मिक संवाद; विस्तृत अशा कालपटाचा साधलेला समन्वय; ऐतिहासिक लेखनावेळी आवश्यक असणारी तटस्थता; शोकात्मिकेचा परिणाम साधण्यासाठी सूक्ष्मतेने केलेले अखेरचे युद्ध-चित्रण; त्या परिणामाला पोषक ठरावी म्हणून युद्धानंतरची झालेली दैना चित्रित करताना घेतलेली काळजी आणि श्रीमंतांच्या मृत्यूने साधलेला कादंबरीचा शेवट यामुळे ही कादंबरी एकाचवेळी अनेक मुखांनी आपणास खोलवर भिडते. मानवी जीवनाचे युद्धाच्या पार्श्वभूमीवर करून दिलेले हे दर्शन दीर्घकाळ मनात रेंगाळते यात शंका नाही.

(पानिपत : विश्वास पाटील, राजहंस प्रकाशन, पुणे ३०, पृ. ८०४ + १६, एकशे पन्नास रुपये)

अनुक्रमणिका

# झोंबी : आनंद यादव

## शेतातून शाळेकडे

**प्रा. कमलाकर दीक्षित**

आनंद यादव यांनी आपल्या 'झोंबी' या कादंबरीला 'आत्मचरित्रात्मक' असे विशेषण जोडलेले आहे. यादवांच्या बालपणाचा कोणी साक्षीदार त्यांच्या तत्कालीन चरित्राशी या लेखनाची तुलना करू शकेल; किंवा शिकणाऱ्या पहिल्या पिढीला काय भोग भोगावे लागतात त्याचे या कादंबरीत चित्रण असल्यामुळे तिचे समाजशास्त्रीय दृष्टिकोणातून स्थान ठरविता येईल. (ही कामगिरी पु. ल. देशपांडे यांनी प्रस्तावनेत अतिशय वेधक रीतीने पार पाडलेली आहे.) तिसरे म्हणजे एक साहित्यकृती म्हणून या पुस्तकाकडे पाहाता येईल.

कोल्हापूर नजिकच्या कागल या गावात नोव्हेंबर १९३५ मध्ये जन्माला आलेल्या आनंदा जकाते या मुलाची तो एस्. एस्. सी. होईपर्यंत जी फरपट झाली त्या फरपटीची ही कहाणी आहे. रतनू आणि तारा यांना १०-११ मुले झाली. त्यांतील आनंदा मधला. रतनू हा दुसऱ्याची शेती खंडाने करणारा शेतकरी. कष्टाच्या मानाने आवक कमी. संतती बेसुमार. पोटाची पंचाईत. अशा शेतकऱ्याला शेतकामाला रोजगारी गडी परवडत नाहीत. बायकापोरे हेच त्यांचे रोजगारी. 'रावून खाणे' म्हणजे तेच. अशा शेतकऱ्याला पोरांना शाळा शिकवणे परवडत नसते; कारण ती भांडवली गुंतवणूक असते. गरीब माणसाजवळ कुठले भांडवल आणि कसली गुंतवणूक! त्यामुळे आनंदाच्या शाळाशिक्षणाला रतनूचा कडोविकडीचा विरोध आहे. आनंदाला तर शिकायचेच आहे. या दोन जबरदस्त शक्तीतील कुस्तीचे म्हणजे झोंबीचे चित्रण म्हणजे ही कादंबरी. यात रतनूचा पराभव होतो आणि आनंदाचा विजय होतो. आनंद यादव यांनी हा एवढा कथाभाग अतिशय प्रत्ययकारी पद्धतीने सांगितला आहे. निवेदनपद्धती कालानुक्रमी म्हणजे आरंभापासून शेवटापर्यंत अशी सरळ आहे. पुढे काय होणार या उत्सुकतेने वाचक वाचीत राहातो. या कथानकात काही प्रसंग स्वयंपूर्ण असूनही मूळ कथासूत्राशी बांधले गेलेले आहेत. उदाहरणार्थ, कंवाळा-आकणी यांची प्रकरणे, तंबाखू तरूची चोरी, गोसाव्याचे प्रकरण, गांधी-वधोत्तर जळित, आनंदाचे पळून जाणे, वगैरे. या सर्व घटना मूळ कथेशी सेंद्रिय रीतीने जुळलेल्या आहेत. फक्त आनशीच्या शेवटच्या दिवसांचे निवेदन लांबल्यासारखे वाटते.

या कादंबरीत मुख्य पात्रे दोन. आनंदा आणि रतनू. ती एकमेकांशी विरो-

अनुक्रमणिका

धात आहेत. एका अर्थाने आनंदाच्या शिक्षणाच्या मार्गात रतनू येतो आहे तर दुसऱ्या अर्थाने रतनूच्या आखीव जीवनात आनंदा अडथळे आणतो आहे. आनंदाला प्रवाह म्हणता आले तर रतनूला काठ म्हणावे लागेल. दोघेही जिद्दी. हटायला कोणीच तयार नाही.

या दोघांमध्ये आनंदा हा अधिक शहाणा, कष्टाळू, प्रेमळ व लवचिक आहे. या गुणांच्या जोरावरच तो रतनूवर म्हणजे परिस्थितीवर मात करतो. या गुणात रतनू तुलनेने उणा पडतो. म्हणून त्याचा पराभव होतो.

आनन्दा ताराच्या वळणावर अधिक गेलेला आहे. त्याचे गुण त्याने आजोळकडून उचललेले दिसतात. साहजिकच तारा आणि रतनूच्या झगड्याचा विस्तार म्हणजेच आन्दा आणि रतनूचा संघर्ष होय. आनंदाच्या उपजत प्रवृत्ती चांगल्या आहेत. त्याचा हेतू उचित आहे. त्यामुळे त्याच्या चुका किंवा चोऱ्या कमी महत्त्वाच्या ठरतात. आपली आई, भावंडे यांच्याबद्दल त्याच्या पोटात अपार माया आहे. तो कोणाबद्दलही वाईट बोलत नाही. शेवटचे रतनूचे गरीब होणेही त्याला आवडत नाही. वाघाची गाय होणे त्याला बघवत नाही. ज्या अक्कोळकर नावाच्या नामधारी शिक्षकांनी त्याचा पावलोपावली पाणउतारा केला त्यांच्याबद्दलही आन्दा वेडेवाकडे बोलत नाही. कोल्हापुरातील काही शाळा-प्रमुखांनी त्याला बदमाष समजून हाकलून दिले. यावर 'या माणसाला कशाचाच काही पत्ता नव्हता. तो कुठल्या तरी अंतराळ जगात जगत होता,' एवढेच तो म्हणतो.

आन्दाप्रमाणेच रतनू हे पात्रही यादवांनी प्रभावी रंगविलेले आहे. रतनू हा आन्दाच्या मानाने शहाणपणा, प्रेमळपणा, कष्टाळूपणा व लवचिकपणा या चारी गुणांत डावा आहे. शहाणपणाच्या कमतरतेमुळे तो स्वतःला आन्दाला किंवा कुटुंबाला अचूक मार्गदर्शन करू शकत नाही. जीवनाला दिशा देऊ शकत नाही. तो कष्ट करतो. पण त्याची कष्टावर श्रद्धा नाही. कष्ट हे रतनूच्या दृष्टीने एक आन्हिक आहे. त्यामुळे तो कष्टातही चुकारपणा करतो. त्यासाठी बायका-पोरांना कामाला लावतो. याच स्वभावामुळे त्याला बायकापोरांत आदरभाव लाभत नाही. लवचिकपणाच्या उणिवेमुळे तो वाकत नाही. मग मोडणे एवढेच त्याच्या नशीबी शिल्लक उरते. रतनूच्या अंगात प्रेमळपणाही कमी आहे. त्याच्या पोटात कोणाबद्दलही फारशी मायाममता नाही. बायकामुलांना शिवीगाळ व मारहाण तो जरा जास्तच करतो. त्यामुळेही बायकामुलांत व सग्यासोयऱ्यांत रतनूबद्दल अनादर आहे. बौद्धिक कुवत कमी पडत असल्यामुळे 'शेपं कोपेन पूरयेत' हा त्याचा खाक्या आहे. या प्रेमळपणाच्या अभावामुळे रतनूला कोणाचेच सहकार्य असे लाभत नाही. सारांश ज्या गुणांमुळे आन्दा यशस्वी होणे अटळ होते त्याच गुणांच्या अभावी रतनू अपयशी बनणे अपरिहार्य ठरले. हे काही असले तरी रतनूच्या अंगी काही गुण आदर वाटावा असे आहेत. उदाहरणार्थ, रतनूला दोन मैतरणी होत्या.

पण रतनूने हे दोन्ही संबंध लक्ष्मणरेषेच्या आत ठेवले. त्यांना आपल्या संसारात हात घालू दिला नाही. ही जबाबदारीची जाणीव मोठी आहे. परिस्थितीने गांजलेला असूनही तंबाखूशिवाय कोणतेही व्यसन तो करीत नाही. तो कधी हताश झालेला दिसत नाही. सर्व घाव सोसत तो वडासारखा ताठ उभा आहे. घराच्या रक्षणासाठी फरशी कुऱ्हाड घेऊन तो दारात बसतो. घराच्या रक्षणासाठी कुटुंबप्रमुख प्राणाची बाजी लावायला तयार झालेला पाहाताना कोणालाही अभिमानच वाटतो.

तिसरी महत्त्वाची आणि मनोहर व्यक्तिरेखा म्हणजे तारा. आन्दाची आई. शहाणपणा, कष्टाळूपणा, प्रेमळपणा आणि लवचिकपणा हे गुण तिच्याच रक्तातून आन्दाला लाभलेले आहेत. रतनू नावाच्या वणव्याशी तिचे शब्दशः लग्न लागलेले आहे. तारा म्हणजे जातिवंत शहाणपणा. मूर्ख बायकांप्रमाणे आगीशी खेळण्यात ती आपली तुटपुंजी कार्यशक्ती फुकट घालवीत नाही. रतनूला बगल देऊन आपली कार्यशक्ती ती भयाण परिस्थिती सुसह्य करण्यासाठी वेचते. रतनूसमोर तोंडाने पडते घेत घेत संपूर्ण संसार तारा स्वतःच्या मर्जीनुसार करते. संसाराच्या साऱ्या जबाबदाऱ्या तिने पेलल्या. साऱ्यांचे सारे मार्गी लावले. कंबळाला घराबाहेर काढण्यासाठी ताराने रतनूच्या मैतरणींची मदत घेतली. काटयाने काटा काढला. ही महामुत्सद्देगिरी नव्हे तर काय ? आन्दाच्या शिक्षणाला तिचा पाठिंबा होता. दत्ताजीराव देसायांकरवी रतनूला कानपिचक्या द्यायची युक्ती ताराचीच. अशा युक्त्यांनाच नवीन परिभाषेत ' व्यवस्थापकीय कौशल्य ' असे नाव आहे.

नवऱ्याच्या नव्हे तर पोराच्या मार्गाने जाण्यात हित आहे हे जाणण्याइतकी तारा शहाणी आहे. आपला दहा-अकरा पोरांचा आणि भडकत्या नवऱ्याचा संसार तारा मन लावून करते. पोरांच्या पोटात घास पडावा म्हणून झटते. पोरांच्या हौसामौजा एकदोनच पैसे खर्चून का होईना पण पुरविते. त्यांची मने मारीत नाही. पोरे कामाने दमल्यावर ' दमलास बाबा ' म्हणते. साहजिकच सारी पोरे रतनूविरुद्ध ताराला सामील असतात. स्वतःचा एवढा धबडगा असतानाही ताराला आपल्या वडिलांच्या आणि भावाच्या पोटापाण्याची काळजी आहे. मार खाऊनही ती त्यांना तुकडा घालते. लिंगाप्पाशी आनसाचे लग्न लावून ती एका धोंड्यात दोन पक्षी मारते– नाही जगविते ! आनसाची शुश्रुषा करते. हिराचे नांदणे मार्गी लावते. ताराच्या करतुकीला खरोखरच सीमा नाहीत. राणी असती तर राज्य चालविले असते. तिचा लवचिकपणा तर शब्दाच्या पलीकडला आहे. तिच्या स्वभावात थोडा जरी ताठरपणा असता तरी रतनूने तिचा जीव घेतला असता. पोरे परदेशी झाली असती. एका बाजूला दैत्यासारखा नवरा आणि दुसऱ्या बाजूला सोन्यासारखा पोरगा या कात्रीच्या दोन पात्यांत तारा कापली जात होती. मासोळीच्या जातिवंत लवचिकपणाची काठी करून तारा हा तारेवरचा नाच करते.

आन्दाचे घरातील जिणे तारामुळेच सुसह्य होते. नाही तर तो केव्हाच घरावाहेर पडून परागंदा झाला असता आणि दर वेळी भूक भागविण्यासाठी केळयांच्या साली पुऱ्या पडत नाहीत हे समजून आल्यानंतर त्यालाही पोटासाठी रतनूचाच कित्ता गिरवावा लागला असता. शिकायचा विचार मनातल्या मनात जिरून गेला असता. सारांश आन्दाच्या यशाला ताराच कारणीभूत आहे. रतनू-बरोबरच्या झोंबीत ताराच त्याला भावनिक आधार पुरविते. प्रत्येक यशस्वी पुरुषामागे एक स्त्री उभी असते असे म्हणतात. आन्दाच्या यशामागे तारा उभी असते.

आन्दा, रतनू आणि तारा हे 'झोंबी' या त्रिकोणाचे तीन कोन आहेत. आन्दा आणि तारा यांच्यात संवाद असून आन्दा आणि रतनू तसेच तारा आणि रतनू यांच्यात विरोध आहे. आन्दा आणि तारा यांचा संवाद आन्दा–रतनू आणि तारा–रतनू या विरोधांना तोलून धरतो.

कादंवरीत इतर लहानमोठी ६०–६५ पात्रे येतात. त्यांपैकी वरीच आन्दाच्या शिक्षणावद्दल सहानुभूती वाळगणारी तर काही त्याला विरोध करणारी आहेत. पात्रे लहानमोठी असली तरी दोन–चार वाक्यांमधून किंवा एक दोन कृत्यांमधून यादवांनी त्यांच्या व्यक्तिरेखा ठळक आणि जिवंत केलेल्या आहेत.

आनंद यादव हे मूलतः कविप्रकृतीचे आहेत. त्यामुळे त्यांची शैली ही काव्यात्मक असते. गद्य निवेदन करता करता मध्येच एखादे काव्यात्म विधान यादव असे टाकतात की जणू खंड्याची भरारी. यादवांनी पदोपदी अशा चित्तवेधी भराऱ्या घेतलेल्या आहेत. त्या मुळातूनच वाचायला हव्यात. यादव यांनी या कादंवरीचे संपूर्ण निवेदन आणि वहुतांश संवादलेखन प्रमाणभाषेत केलेले आहे. 'गोतावळा' या त्यांच्या पहिल्या कादंवरीचे संवाद व निवेदन ग्रामीण वोलीत आहेत. यादव हे पहिल्या दर्जाचे लेखक असल्यामुळे दोन्ही कादंवऱ्या दर्जेदारच उतरलेल्या आहेत. त्यामुळे प्रमाणभाषा वर्ग की वोलीभाषा हा वादाचा मुद्दा त्यांच्या वावतीत तरी गौण ठरला आहे. भाषा कोणतीही वापरली तरी यादव लेखन कसदारच करतात. यादव यांचे चाहते नागरी भागातही आहेत. त्यांच्यासाठी काही अनोळखी ग्रामीण शब्दांचा अर्थ परिशिष्टात दिला असता तर वरे झाले असते. शेवटी एक किरकोळ वाव नोंदवायची म्हणजे यादवांच्या सर्वच लेखनात अर्धविरामांचा वापर जरा जास्त प्रमाणात झालेला नेहमी जाणवतो. इतके अर्धविराम आवश्यक आहेत काय याचा यादवांनी विचार करावा.

( झोंबी : आनंद यादव, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, नव्वद रुपये ).

---

● **रुसवा फुगवा** – सौ. जयश्री टोपे, चेतश्री प्रकाशन, 'मुक्ताई' धुळे रोड, अमळनेर–४२५४०१, पृ. ५०, रु. १५, १९८८.

---

# अलकनंदा : सुरेश द्वादशीवार

## स्वत्वाचे पुन्हा भान येते तेव्हा–

**सौ. ज्योती प्रकाश खांडवे**

'अलकनंदा' ही सुरेश द्वादशीवारांची पहिलीच कादंबरी. एक हळुवार संयमी प्रेमकथा. मनोविश्लेपणात्मक, वास्तवाचे भान न सोडणारी 'अलकनंदा' या मनस्वी पात्राभोवती फिरणारी.

कादंबरीत मोजकीच पात्रे आहेत. दादासाहेब, नायक, अलकनंदा (शरयू) आणि शिरीष. दादासाहेब समाजकार्यकर्ते. लेखकाने बराच वाव या पात्राला दिल्यामुळे त्याच्या व्यक्तिमत्वावर पुरेसा प्रकाश पडतो. दुसऱ्यांच्या मताला किंमत न देणारे, स्वतःची ठाम मतं असणारे दादासाहेब स्वतःपलीकडे फारसे जात नाही. त्यांनी धारण केलेला आणि समाजाने बहाल केलेला मोठेपणाचा मुखवटा त्यांना एका विशिष्ट उंचीवर ठेवतो. त्यामुळे एक प्रकारचा दुरावा इतरांमध्ये निर्माण होतो. अशा मोठ्या माणसाच्या मोठेपणाखाली वावरणारी माणसे कशी खुजी बनतात याचेच उदाहरण म्हणजे त्यांचा मुलगा शिरीष. एकुलता. एक देखणा. आकर्षक व्यक्तिमत्त्व. दादासाहेबांच्या मोठेपणालाच भूषण मानणारा आणि स्वत्व गमावून बसलेला. तो एखाद्या बांडगुळासारखा वाटतो. कादंबरीत त्याला फारसा वाव नाही.

शिरीषची पत्नी अलकनंदा मनस्वी, हळुवार, छोटया छोटया गोष्टीत आनंद मानणारी, कलावंत, तरल संवेदनशील. तशात तिला 'तो' भेटतो. ती हरवून जाते. नियतीला ते मंजूर नसते. तिची सतार अबोल होते. दादासाहेब भेटतात तेव्हा ती भारावून जाते आणि शिरीषशी लग्न करायला तयार होते. इथेच 'अलकनंदा' संपते. प्राप्त परिस्थितीशी तडजोड करण्याकरिता स्वतःशी विसंगत असा शरयूचा मुखवटा ती धारण करते. तिच्यातली अलकनंदा अतिविव्हळ सतारीच्या सुरातून मधूनच आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देत असते. याच वळणावर नायकाची भेट होते. तो तिच्यातली 'अलकनंदा' जागी करतो. इथेच कादंबरी संपते.

अशा कितीतरी अलकनंदा 'शरयू' बनलेल्या आपल्याला दिसतील. लग्नापूर्वीची हीच का ती मी असा प्रश्न पडावा इतका बदल तिच्यात घडलेला असतो. ह्याचं मूळ समाजातील स्त्रीविषयक दृष्टिकोणात आहे. ती स्वतःची कुणीच नसते. संदर्भ बनून जगणं हीच तिची नियती. मुलगी, सून, आई, बायको अशी नाती

जपण्यातच तिचं स्वत्व हरवतं. जिला ते जमत नाही ती मोडून पडते. अलकनंदे-सारखी. अलकनंदेचं व्यक्तिचित्र दाद देण्यालायक उठावदार झालं आहे. ती मनाला चटका लावून जाते.

ही कादंवरी घटनाप्रधान नाही. अलकनंदा ते शरयू आणि शरयू ते अलकनंदा हा प्रवास ही एकच घटना. एक दुभंगलेलं व्यक्तिमत्त्व एकत्रित होणे हीच घटना. या घटनेचा साक्षीदार, कारण वनलेला नायक आणि त्यांच्यात होणारी भावनिक गुंतवणूक मानसिक पातळीवर सनातन प्रश्न निर्माण करणारी हळुवार प्रेमकथा. लेखकाने चित्रित केलेला हा प्रवास मन मोहून जातो.

सुरेश द्वादशीवारांची ही पहिलीच कादंवरी आशा निर्माण करून जाते. प्रथमपुरुषी निवेदनपद्धतीमुळे तिला मर्यादा पडतात. इतर पात्रांवर उगाच अन्याय झाल्यासारखं वाटतं. विशिष्ट निवेदनपद्धतीमुळे अभिव्यक्तीस मर्यादा पडतात. आशय व अभिव्यक्तीत एकरूपता साधत नाही. त्यामुळे यातील काही पात्रं धूसर वाटतात. उदा. नायकाची पत्नी. दुसरा कुठलाही घाट स्वीकारला असता तर आशयाच्या वेगवेगळ्या पातळीवर ही कथा फुलवता आली असती. केवळ नायकाच्याच चष्म्यातून सर्व पात्रांकडे किंवा घटनांकडे पाहिल्यामुळे पात्रांचं अपूर्णत्व, आशयाचं एकारलेपण आणि नायकाची विशिष्ट वैचारिक दृष्टीच जाणवते. ही या कादंबरीची मर्यादा. अलकनंदेच्या भावनिक ताणतणावाचे सुरेख चित्रण यात आले आहे. कुठल्याही संवेदनशील माणसाला ही कादंवरी नक्कीच आवडेल. मुखवट्याच्या जगात संवेदनशील माणसाची होणारी तारांवळ शोकांतिका वनून जाते.

अलकनंदेचं तुटलेपण सांधताना तिला स्वतःच्या पायावर उभी राहण्यास मदत करताना सुरुवातीला वैचारिक पातळीवरून, अनुकंपेनं काहीशा उत्सुकतेनं वघणारा नायक भावनिक दृष्ट्याही गुंतत जातो. इथूनच संघर्षाला सुरुवात होते. लौकिकदृष्ट्या अमान्य होणारे हे संवंध तिथेच थांववून नायकाने माघार घेतली आहे. नायक अगतिक आहे. कादंवरीचा संघर्षविंदूच शेवट झालेला आहे. मध्यरात्रीच्या नीरव शांततेत सतारीचे आर्त, विसंवादी स्वर छेडणारी, अंतर्मनातील संघर्षामुळे व प्राप्त परिस्थितीमुळे व्यक्तित्व दुभंगलेली, उत्तर न मिळणारे सनातन प्रश्न निर्माण करणारी, विलोभनीय व्यक्तित्व लाभलेली अलकनंदा ही या कादंबरीची जमेची वाजू. तरल संवेदनशील मनाला भावणारी कादंवरी अलकनंदा.

( अलकनंदा : सुरेश द्वादशीवार, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, तीस रुपये )

---

- **मुला** – सुधा चाफेकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयनगर, पुणे ३०, पृ. ७१, रु. २०, १९८८.
- **स्वस्तिका** – वा. ज्यो. देशपांडे, श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०, पृ. ६७, रु. २७.५०, १९८८.

---



अनुक्रमणिका

# लक्ष्मीसेतु/गडदेचा बहिरी : गो. नी. दांडेकर

## दोन लघु-कादंबऱ्या

कु. सुनीता पेंडसे

अवघ्या महाराष्ट्राचे लाडके, सुविख्यात साहित्यिक गो. नी. दांडेकर यांनी आतापावेतो मराठी वाङ्मयात अतिशय मोलाची भर घातली आहे. त्यांच्या अनेक कादंबऱ्या रसिकांच्या मनात कायमचे वास्तव्य करून वसल्या आहेत. 'मृण्मयी', "पडघवली' किती किती म्हणून नावे घ्यावीत? त्यांचे कोकणप्रेम अन् दुर्गभ्रमणाचे वेड आपल्या मनालाही वेड लावून जाते. विशेषत: आम्हा कोकण कधीही अनुभवायला न मिळालेल्या अभाग्यांना तर कोकणची अधिकच ओढ लावून जाते. आपल्या पूर्वजांनी ज्या कोकणात गुण्यागोविंदाने राहून सुखाच्या बागा फुलवल्या, दु:खाचे आघात सोसले, त्या कोकणाविषयी आत्यंतिक आत्मीयता मनी दाटून येते. असंच एक पुस्तक 'गो. नीं.'चं म्हणून वाचायला घेतलं आणि अर्थातच ते मनाचा ठाव घेऊन गेलं. नाव जरा वेगळंच होतं– 'लक्ष्मीसेतु/गडदेचा बहिरी' दोन दीर्घ कथांना सामावून घेणारे हे पुस्तक खरंच अप्रतिम वाटलं.

'लक्ष्मीसेतु' ही कोकणातल्या एका गावच्या लोकांची जिद्द प्रस्तुत करणारी कहाणी. कथेची सुरुवात होते ती शंभर वर्षांपूर्वीच्या विलक्षण इतिहासापासून. गावाचं नाव उजगाव. उजगावचा वर्षभर ठणठणीत रहाणारा कोरडा पऱ्ह्या सती लक्ष्मीच्या आशीर्वादाने वर्षभर भरून वहायला लागतो. लोकांच्या बागा तर फुलवतोच पण त्यांच्यातील एकजूट अन् श्रद्धाही जोपासतो. त्या पाण्याचा योग्य विनियोग करण्यासाठी गावकरी एकजुटीने धरण बांधतात. पण अचानक एका वर्षी तीन–चार पिढ्यांची घरे नांदती ठेवणारं हे धरण कोसळतं. तेव्हा पुन्हा एकदा सारे गावकरी कंबरा कसून तयार होतात. त्या भागातल्या आमदारांच्या मदतीने सर्व शासकीय अडचणींवर मात करून 'जिंकू किंवा मरू' या तयारीने मंत्र्यांना घेराव घालून त्यांची संमती मिळवतात. धरण पूर्ण होते अन् त्याला सतीचेच नाव दिले जाते – 'लक्ष्मीसेतु'. अशी ही एका चिमुकल्या गावातील गावकऱ्यांच्या एकजुटीची, जिद्दीची कथा. भाऊबंदकीने उजाड झालेल्या कोकणात गावकऱ्यांच्या एकजुटीने उभ्या राहिलेल्या धरणाची कहाणी मनाला जाऊन भिडते. स्फूर्तिदायी ठरते. राष्ट्रीय एकात्मतेची आत्यंतिक गरज ज्या काळात आहे त्या आजच्या काळात तर चिमुकल्या भूमीच्या लेकरांची ही एकात्मता विशेष मन आकर्षून घेते.



अनुक्रमणिका



गो. नीं. च्या रसाळ शैलीने तर ह्या दीर्घकथेला अधिकच बहार आणली आहे. त्यात निसर्गसंपन्न कोकणाचे वर्णन. कथाबीज अन् वर्णनशैली अशी अप्रतिम आहे की ही कथा मनावर कायमची कोरली जाते.

'गडदेचा बहिरी' ही ह्या मोह घालणाऱ्या पुस्तकातील दुसरी दीर्घकथा. राजमाचीच्या परिसरातील एका अतिप्राचीन व दुर्मिळ गुहामंदिरातील देवापुढील पशुहत्येविरुद्ध त्या रहाळातील लोकांनी जी निकराची झुंज दिली तिची ही मनाचा वेध घेणारी कहाणी. 'गडदेचा बहिरी' हा त्या गुहामंदिरातील देव. त्या देवाची प्राचीन व सुंदर मूर्ती, त्या मूर्तीच्यासमोर होणारा उत्सव, त्यासाठी प्रत्यक्ष शिवछत्रपतींनी केलेली तरतूद, त्यांच्या राजमुद्रेचे पत्र एका विठ्ठलभक्त पण आधुनिक विचारांच्या कीर्तनकाराला एक विलक्षण स्फूर्ती देऊन जाते. त्या अतिप्राचीन देवस्थानासमोर होणाऱ्या पशुहत्येविरुद्ध ते सारे रान उठवतात. तुकारामांच्या अभंगांतून, गाडगेबाबांच्या आदर्शातून ते त्या रहाळातील लोकांच्या अंधश्रद्धा दूर करण्यात यशस्वी होतात. आपल्या प्रभावी कीर्तनातून देवऋष्याला ते नामोहरम करतात. 'पशुहत्या करणे हे पाप आहे' हे उमगलेले त्या रहाळातले सारे लोक बुवांच्या अन् एका सुशिक्षित मित्रमंडळाच्या कल्पनेन्वये 'गडदेच्या बहिरी'ला सर्व नद्यांच्या जलाने अभिषेक करतात. त्याच वेळी पशुहत्या करायला टपलेल्या देवऋष्याविरुद्ध निकरांची झुंज चालू करतात. त्याचीच ही मनस्वी दीर्घकथा.

आज आपल्या देशात केवळ अंधश्रद्धेपायी खेड्या–पाड्यांतून हजारो लोक योग्य उपचाराअभावी प्राणाला मुकतात. नवस फेडण्यासाठी कित्येक मुक्या प्राण्यांना जीव गमवावा लागतो. त्यातून निष्पन्न काहीच होत नाही. उलट लोक एखाद्या हृदयहीन मांत्रिकाचे गुलाम बनतात. त्या मांत्रिकाची रेलचेल होते पण हजारो गरीब कर्जबाजारी होतात अन् आयुष्यातून उठतात. वर आणखीन् बिचारे मुके प्राणी मरतात ते वेगळेच. अशी परिस्थिती असताना अशाच एका मागासलेल्या रहाळात शिवछत्रपतींपासून स्फूर्ती घेऊन एक देवभक्त लोकजागृतीचे बाण घेतो अन् आपल्या आत्मविश्वासाच्या, श्रद्धेच्या अन् रसाळ, खणखणीत वाणीच्या बळावर त्या कार्यात यशस्वीही होतो. पशुहत्येविरुद्ध सारे लोक बंड करून उठतात. अंधश्रद्धेची जळमटे दूर होऊन विज्ञानयुगाकडे त्यांची वाटचाल सुरू होते. त्यांची ही कथा खरोखरच विलक्षण स्फूर्तिदायी आहे. आशेचे किरण दाखवणारी आहे. जनजागरणाचे महत्त्व अन् ते कसे घडून येऊ शकते याचा उत्तम आदर्श ही कथा देऊन जाते. लोकजागरण आणि लोकविकासाचे महत्त्व पटलेल्या प्रत्येक जागरूक नागरिकाला ती निश्चितपणे प्रेरणादायी ठरेल. या कथेची प्रेरणा, ग्रामीण पार्श्वभूमी अन् गो. नीं. ची जिवंत वर्णनशैली अशा त्रिवेणी संगमामुळे ती मनाला वेडावून टाकते.

तर असा आहे 'लक्ष्मीसेतु' अन् 'गडदेचा वहिरी!' मनाला झपाटून टाकणारा, प्रेरणा देणारा अन् मन मोहूनही टाकणारा!

( लक्ष्मीसेतु / गडदेचा वहिरी : गो. नी. दांडेकर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, तीस रुपये )

---

# कृष्णचंदन : धनंजय आचार्य

## जीएंच्या २० व्यक्तिरेखांचा वेधक शोध

**अनिल बळेल**

---

जी. ए. गेले आणि जास्त जास्त कळत गेले.

जी. ए. गेल्यावर लगेचच 'डोहकाळिमा' आले, 'माणसं, अरभाट आणि चिल्लर' आले आणि अगदी अलीकडे 'जी. ए. : एक पोर्ट्रेट' आणि 'कृष्णचंदन' आले. या प्रत्येक पुस्तकातून जी. ए. पुन्हा पुन्हा भेटत गेले. अलीकडच्या दोन पुस्तकांतून ते अधिक जवळ आलेत. सुभाष अवचटांनी नुसत्या कुंचल्यातून आणि कॅमेऱ्यातून नव्हे तर लेखणीतूनही चितारलेल्या पोर्ट्रेटने हे 'कुलूपवंद' व्यक्तिमत्त्व 'खटचाळ'ही होते हे पटले आणि धनंजय आचार्य यांनी तर केवळ जीएंच्या व्यक्तिरेखांतूनच ही काही औरच किमया होती हे जाणवून दिले.

पुन्हा पुन्हा वाचावा आणि प्रत्येक वाचनातून काही नवा उलगडा व्हावा असा हा लेखक आणि त्याने भारावून गेलेला आचार्यांसारखा अभ्यासक. यामुळे या जी. एं. च्या कथासृष्टीतील अविस्मरणीय व्यक्तिरेखांची ओळख करून देणाऱ्या लेखातून जी. एं. च्या त्या त्या कथाच वाचकांसमोर जिवंत करण्यात लेखक यशस्वी झाला आहे. साऱ्याच नव्हे पण काही कथांतून जी. ए. स्वतःच कसे दिसतात हेही आचार्य पटवून देतात.

आचार्य म्हणतात, 'जी. एं. चे बालपण प्रामुख्याने जाणवते 'तुती', 'कैरी' आणि 'राधी' ह्या कथांतून! या तीनही कथांचा निवेदक आहे एक लहान मुलगा. मी!' या कथांतील शालेय जीवन वाचताना 'माणसं—अरभाट आणि चिल्लर' ची आठवण होते आणि आचार्यांचे मत पटते.

नवऱ्याच्या बाहेरख्यालीपणामुळे आपल्या आयुष्याची निरीच सुटली असतानाही भाच्यावर निरतिशय माया करणारी 'कैरी'मधील 'तानीमावशी' हीही बहुधा जी. एं. च्याच आयुष्यातली 'मावशी' असावी असे वाटण्याइतकी जिवंत

उतरली आहे हे सप्रमाण पटवून देताना आचार्य म्हणतात, 'तानीमावशी या व्यक्तिरेखेचे बलस्थान आहेत तिचे संवाद.'

तानीमावशीला मूलबाळ नव्हते आणि तिला तर मुलांचा अतिशय लळा होता. म्हणून तिच्या मायेचा सारा उत्स्फूर्त वर्षाव भाच्यावर होतो पण घरातल्याच मोलकरणीच्या नादी लागलेल्या तिच्या नवऱ्याच्या लक्षात काही ही गोष्ट येत नाही. पोटी मूल जन्माला येणे ही एक साधी जीवशास्त्रीय गोष्ट. बी जमिनीत रुजून तरारून वर येण्याइतकी साधी पण ज्या अभागी स्त्रिया या मामुली वाटणाऱ्या सुखाला पारख्या होतात, त्यांच्यासाठी तीच गोष्ट अपूर्व ठरते. हे वांझोटेपणाचे दुःख जी. एं. नी 'वंश' मधील 'करेव्वा' च्या रूपाने कसे भेदकपणे उभे केले आहे हेही आचार्य दाखवून देतात.

हे आहे 'आई' न झाल्याचे दुःख. तर 'आई' होऊनही आपले वागणे आपल्या अपत्याने समजून घेतले नाही तर आयुष्याचा कसा 'पराभव' होतो हेही 'पराभव' मधील 'आई' मुळे कळते. तीच गोष्ट आपल्या पित्याचे वागणे समजून घेतले नाही तर आणि ते तसे समजावून देण्यास तो उणा पडला तर आयुष्याची कशी ससेहोलपट होते ह्याची गलबलून टाकणारी जाणीव होते, 'नाडगौडा मास्तर' या व्यक्तिरेखेतून.

या व्यक्तिरेखेचे चित्रण करताना आचार्य जी. एं. च्या कथासृष्टीत शिक्षकीपेशा कसा आला आहे हेही जाता जाता सांगतात. 'गणेशवाडी भट' या त्यांना मनस्वी आवडलेल्या व्यक्तिरेखेचे विवेचन करतानाही जी. एं. च्या कथांत या ना त्या प्रकारे आलेल्या 'भटमंडळीं' ची एक यादीच ते पेश करतात. या विवेचनाच्या ओघात जी. एं. ना असलेली कुत्रा या प्राण्याची समग्र जाणीव आणि त्यांची कुत्र्याकडे पाहण्याची विशिष्ट नजर त्यांच्या 'निळासावळा' ते 'पिंगळावेळ' या आठ कथासंग्रहांतील ९७ कथांपैकी २२ कथांमधून कशी दिसते हेही आचार्य नोंदवून ठेवतात.

डॉ. दादा फाटकांच्या मनोव्यापारांचा तरल वेध घेणारी, एखाद्या मुलायम वस्त्राप्रमाणे विणलेली एक समर्थ कथा 'सोडवण' तर 'वस्त्र' ही कथा उलगडत जाते तसतशी एका तळमळीच्या सेवाभावी नर्सची—मिस् मेरी डिसोझाची—दारूण शोकांतिका नजरेसमोर साकार होते. 'मानव नियतीच्या हातातील एक बाहुले आहे' हे जीएंचे आवडते जीवन—चिंतन कसे होते हे या व्यक्तिरेखांचा वेध घेताना आचार्य जसे दाखवून देतात तसेच ते 'दानय्या' चे वर्णन करताना सर्प—प्रतिमा ही जीएंची कशी आवडती प्रतिमा होती, हे सांगायलाही विसरत नाहीत.

प्रतिमांच्या नेमक्या वापरामुळे कथा आणि व्यक्तिरेखा कशी धारदार बनते याचा 'कावेरी'च्या निमित्ताने आचार्यांनी केलेला उहापोह मनोज्ञ वाटतो. या कथेतील 'उधळलेल्या शेगडी' ची प्रतिमा एक धगधगते दुःख कसे साकार करते

हे आचार्य जेव्हा सांगू लागतात तेव्हा ती कथा मुळातूनच वाचण्याचा मोह् अनावर होतो.

— वाचकाने जीएंच्या कथा वाचाव्यात, त्यातील गूढतेचा वाऊ न करता समजून घेऊन वाचाव्यात हाच या लेखनाचा एक उद्देश आहे. 'साहित्यसूची' नियतकालिकातून यातील काही लेखन प्रसिद्ध होत असताना ते वाचून प्रकाशकालाही मोह आवरत नाही आणि त्यानेच लेखकाकडे या संग्रहाची मागणी केली. चित्रकार चंद्रमोहन कुलकर्णी यांच्याकडून त्या त्या व्यक्तिरेखा रेखाटून घेतल्या. जीएंचे स्नेही म. द. हातकणंगलेकर यांची आटोपशीर प्रस्तावना मिळविली आणि त्यातूनच हा जीएंच्या कथासृष्टीतील व्यक्तिरेखांचा वेध घेणारा आणि त्यांनाच समर्पित केलेला 'कृष्णचंदन' संग्रह साकार झाला.

एखाद्या लेखकाच्या कथालेखनातील व्यक्तिरेखांचा शोध घेणारे हे बहुधा पहिलेच पुस्तक असावे—मराठीतीलही आणि इतर भाषांतीलही !

( कृष्णचंदन : धनंजय आचार्य, विमल प्रकाशन, पुणे, सत्तर रुपये )

---

# वाटा आडवाटा : वामन होवाळ

## ग्रामीण—दलित जीवनातील श्रवणीय कथा

**वैजनाथ महाजन**

वाटा—आडवाटा हा श्री. वामन होवाळ यांचा कथासंग्रह. दलित—ग्रामीण साहित्याची प्रत्यक्ष निर्मिती काहीशी थंडावल्यासारखी वाटत असताना बाहेर आलेला हा कथासंग्रह आणखीनच सुखावून जाणारा असा वाटतो. दलित ग्रामीण स्वरूपाच्या या कथा निश्चितच वेगळ्या आहेत.

वामन होवाळ हे नोकरीपायी जरी आता मुंबईत स्थिरावले असले तरी ते आपले जीवन मात्र ग्रामीण क्षेत्रातच जगलेले आहेत. या ग्रामीण जीवनाची त्यांची म्हणून एक स्वतंत्र अशी समज आहे. या जीवनाची त्यांची जाण ही सामर्थ्याची आहे. या ग्रामीण जीवनाशीच दलित जीवन संलग्न आहे. त्यामुळे त्या आयुष्याचाही होवाळ यांचा आवाका मोठा वेधक वाटावा असाच आहे. याचे महत्त्वाचे कारण ह्या कथांतून दिसून येते ते असे की, ह्या दुहेरी जीवनाकडे लेखक होवाळ कोणत्याही रूढ दृष्टिकोणातून पाहात नाहीत. त्यातील बदलाचेही ते अचूक भान ठेवतात. बदलते दलित आणि ग्रामीण वास्तव त्यांची डोळस नजर अगदी नेमकेपणाने टिपताना दिसून येते.



अनुक्रमणिका

जे राजकारण करून गावातील प्रस्थापित पुढारी एका मागासवर्गीयांचे वुजगावणे करून आपला कार्यभाग साधू पहातात तिथे तो मागासवर्गीय सीताराम त्यांना कसा धडा शिकवतो ते अगदी सहज हसत हसत सांगणारी पाटीलकी ही कथा आहे. वरून मिस्किल वाटणारी ही कथा ग्रामीण जीवनाचे नवे भान आज आपणासमोर नव्याने सांगून जाते.

प्रत्येक कथेची मांडणी ही अगदी नजरबंद आणि नेमकी असते त्यांच्या कथेच्या मांडणीचा हा नीटनेटकेपणा आवर्जून दाद द्यावा असाच असतो. आख्खं मेंढरू खाण्याचे डोहाळे लागलेली सरू आणि तिचा नवरा भानू ह्यांची एक मजेदार कथा 'डव्हाळे' ही आहे. हा मुलखावेगळा ढवाळा पुरा करण्यासाठी भानू काय काय क्लृप्त्या करतो त्याचे अत्यंत रेखीव असे दर्शन होते. सोयरीक, नोंद आणि खोडा ह्या अशाच ग्रामीण जीवनाचे समर्पक दर्शन घडविणाऱ्या कथा आहेत. ह्या कथांची मांडणी सरळ साधी आणि कथा हे मूल्य जपून झालेली दिसते.

दलित जीवनाचे एक आरपार असे दर्शन घडविणाऱ्या कथाही संग्रहात आहेत. गावाचा जागर घालणाऱ्या आणि जाणीवपूर्वक जागर नाकारणाऱ्या राघूदादाची कथा काही वेगळा आशय सांगून जाते. एकीकडे परंपरा आणि दुसरीकडे परिवर्तनाकडे ओढ घेणारे राघूदादाचे संवेदनाशील मन यातील द्वंद्व त्यात दिसते. त्याच्या मनःस्थितीचे लेखकाने केलेले चित्रण अत्यंत वेधक असेच आहे.

वामन होवाळ श्रोत्यांच्या समोर कथा सादर करतात. त्या गुणामुळे त्यांच्या लेखनात सावधपणा असतो. या गुणामुळे होवाळ यांच्या कथा वोलक्या वाटतात. वाचनीयता आणि श्रवणीयता हे दोन्ही गुण त्यात आढळतात.

( वाटा आडवाटा : वामन होवाळ, स्वयंदीप प्रकाशन, मुंबई, वत्तीस रुपये )

---

# मातरं : गंगाधर ठाणगे

## स्त्रियांबद्दलची कणव आणि ग्रामीण जीवनातला झिलंदरपणा

**वामन होवाळ**

---

गंगाधर ठाणगे यांच्या 'मातरं' ह्या कथासंग्रहात एकूण सोळा कथा आहेत. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर खेड्यापाड्यांत शिक्षणाचा ओघ पोचला. शहरातल्या साधकबाधक बाबी गतिमानपणे खेड्यापर्यंत गेल्या. सत्तेचं विकेंद्रीकरण झाल्यामुळं ग्रामपंचायत, तालुका पंचायत आणि जिल्हा परिषदांची निर्मिती

झाली. ग्रामीण भागाचा विकास झाला तसाच त्याचा चेहरा–मोहराही बदलला. ह्या सर्व बदलाचे चित्रण गंगाधर ठाणगे यांनी केलेले आहे.

आजवरच्या ग्रामीण साहित्यात स्त्री फक्त रुचिपालट किंवा शृंगार–खुलावटीसाठीच चित्रित केल्याचे दिसून येते. ग्रामीण स्त्रीकडे बघण्याचा पारंपरिक दृष्टिकोण साहित्यिकांनीही त्याज्य मानल्याचे आढळत नाही. स्त्रीबद्दल कारुण्याची भावना जाणवते. कामोत्पादक, शृंगारिक, भडक चित्रमयतेत त्यांना रस नाही. स्त्रीकडे पाहाण्याचा त्यांचा चष्मा अत्यंत निर्मळ, स्वच्छ आणि संयमी आहे.

'चिंचंचा डोह', 'तपकिरीची पुडी', 'निरुपाय', 'उमाळा' ह्या कथा उल्लेखनीय आणि वाचनीय आहेत. ह्या कथांमधून ग्रामीण कौटुंबिकता, सामाजिकता आणि सांस्कृतिकता ह्या संदर्भातील दृष्टिकोण स्पष्ट होतो. पारंपरिक पापपुण्याच्या कल्पना, भिडस्तपणा आणि भित्रेपणा त्यांना खटकतात. परंतु खेडूत माणसाविषयी समजूतदारपणा आणि सहानुभूती वाटते.

माणसात्नं झालेलं 'मातरं' चितारताना ग्रामीण माणसाबरोबरच शहरातला परंतु गावातूनच आलेला, माणूसही तितक्याच तन्मयतेने रंगविलेला आहे, (ग्रहण) घराचं घरपण राहावं आणि अखंड कुटुंबाची भरभराट व्हावी म्हणून मुंबईचा नोकरदार भाऊ काबाडकष्ट करतो. कर्जाचा बोजा सहन करतो, पण त्या बदल्यात त्याच्या वाट्यास विटंबना आणि अवमानच येतो. खेड्यातला साधा भोळा माणूसही आता बिलंदर किंबहुना स्वार्थी झालेला आहे. पगारदाराला वाटाण्याच्या अक्षता देऊन झटपट 'मालदार' बनण्याचा प्रयत्न हा खेडूत भाऊ करतो. ह्या कथेद्वारे नीतिमूल्याच्या अभावी समाजाचा होणारा ऱ्हास आणि आपमतलबीपणा ठाणगे व्यक्त करतात.

'डफडं' हीसुद्धा यदूच्या टिपरुकाप्रमाणंच वाचकाच्या काळजावर हळुवार आघात करते. त्यातील भेदाभेद, त्याची तीव्रता सहन करणारा परंतु स्वाभिमानी यदू दलितांनाही स्वाभिमान असतो हे दाखवून देतो.

अनुभवाचा सच्चेपणा आणि ताजेपणा, साधे, स्पष्ट आणि सरळ निवेदन, ग्रामीण वातावरणाचे सजीव आणि हुबेहूब वर्णन आणि 'माणूस' मग तो शहरातला असो अथवा खेड्यातला ह्याच्याबद्दलची कणव हे या संग्रहाचे प्रमुख विशेष.

( मातरं : गंगाधर ठाणगे, अजय प्रकाशन, मुलुंड, मुंबई ८०, पृष्ठे १५६, पंचेचाळीस रुपये )

---

- **मनमातीचे** – मनीषा पिंपळखरे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे ५६, रु. २७.५०, १९८८.
- **वाग्विलास** – कवि मोरया, संपा. वा. के. लेले, काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी २२१००५, पृ. १२२, पंचवीस रुपये, १९८८.

---



अनुक्रमणिका

जे राजकारण करून गावातील प्रस्थापित पुढारी एका मागासवर्गीयांचे वुजगावणे करून आपला कार्यभाग साधू पहातात तिथे तो मागासवर्गीय सीताराम त्यांना कसा धडा शिकवतो ते अगदी सहज हसत हसत सांगणारी पाटीलकी ही कथा आहे. वरून मिस्किल वाटणारी ही कथा ग्रामीण जीवनाचे नवे भान आज आपणासमोर नव्याने सांगून जाते.

प्रत्येक कथेची मांडणी ही अगदी नजरबंद आणि नेमकी असते त्यांच्या कथेच्या मांडणीचा हा नीटनेटकेपणा आवर्जून दाद द्यावा असाच असतो. आख्खं मेंढरू खाण्याचे डोहाळे लागलेली सरू आणि तिचा नवरा भानू ह्यांची एक मजेदार कथा 'डव्हाळे' ही आहे. हा मुलखावेगळा ढवाळा पुरा करण्यासाठी भानू काय काय क्लृप्त्या करतो त्याचे अत्यंत रेखीव असे दर्शन होते. सोयरीक, नोंद आणि खोडा ह्या अशाच ग्रामीण जीवनाचे समर्पक दर्शन घडविणाऱ्या कथा आहेत. ह्या कथांची मांडणी सरळ साधी आणि कथा हे मूल्य जपून झालेली दिसते.

दलित जीवनाचे एक आरपार असे दर्शन घडविणाऱ्या कथाही संग्रहात आहेत. गावाचा जागर घालणाऱ्या आणि जाणीवपूर्वक जागर नाकारणाऱ्या राघूदादाची कथा काही वेगळा आशय सांगून जाते. एकीकडे परंपरा आणि दुसरीकडे परिवर्तनाकडे ओढ घेणारे राघूदादाचे संवेदनाशील मन यातील द्वंद्व त्यात दिसते. त्याच्या मन:स्थितीचे लेखकाने केलेले चित्रण अत्यंत वेधक असेच आहे.

वामन होवाळ श्रोत्यांच्या समोर कथा सादर करतात. त्या गुणामुळे त्यांच्या लेखनात सावधपणा असतो. या गुणामुळे होवाळ यांच्या कथा बोलक्या वाटतात. वाचनीयता आणि श्रवणीयता हे दोन्ही गुण त्यात आढळतात.

( वाटा आडवाटा : वामन होवाळ, स्वयंदीप प्रकाशन, मुंबई, बत्तीस रुपये )

---

# मातरं : गंगाधर ठाणगे

## स्त्रियांबद्दलची कणव आणि ग्रामीण जीवनातला बिलंदरपणा

वामन होवाळ

---

गंगाधर ठाणगे यांच्या 'मातरं' ह्या कथासंग्रहात एकूण सोळा कथा आहेत. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर खेड्यापाड्यांत शिक्षणाचा ओघ पोचला. शहरातल्या साधकबाधक बाबी गतिमानपणे खेड्यापर्यंत गेल्या. सत्तेचं विकेंद्री-करण झाल्यामुळं ग्रामपंचायत, तालुका पंचायत आणि जिल्हा परिषदांची निर्मिती



अनुक्रमणिका

झाली. ग्रामीण भागाचा विकास झाला तसाच त्याचा चेहरा-मोहराही बदलला. ह्या सर्व बदलाचे चित्रण गंगाधर ठाणगे यांनी केलेले आहे.

आजवरच्या ग्रामीण साहित्यात स्त्री फक्त रुचिपालट किंवा शृंगार-खुलावटीसाठीच चित्रित केल्याचे दिसून येते. ग्रामीण स्त्रीकडे बघण्याचा पारंपरिक दृष्टिकोण साहित्यिकांनीही त्याज्य मानल्याचे आढळत नाही. स्त्रीबद्दल कारुण्याची भावना जाणवते. कामोत्पादक, शृंगारिक, भडक चित्रमयतेत त्यांना रस नाही. स्त्रीकडे पाहाण्याचा त्यांचा चष्मा अत्यंत निर्मळ, स्वच्छ आणि संयमी आहे.

'चिचंचा डोह', 'तपकिरीची पुडी', 'निरुपाय', 'उमाळा' ह्या कथा उल्लेखनीय आणि वाचनीय आहेत. ह्या कथांमधून ग्रामीण कौटुंबिकता, सामाजिकता आणि सांस्कृतिकता ह्या संदर्भातील दृष्टिकोण स्पष्ट होतो. पारंपरिक पापपुण्याच्या कल्पना, भिडस्तपणा आणि भित्रेपणा त्यांना खटकतात. परंतु खेडूत माणसाविषयी समजूतदारपणा आणि सहानुभूती वाटते.

माणसात्नं झालेलं 'मातरं' चितारताना ग्रामीण माणसावरोबरच शहरातला परंतु गावातूनच आलेला, माणूसही तितक्याच तन्मयतेने रंगविलेला आहे, (ग्रहण) घराचं घरपण राहावं आणि अखंड कुटुंबाची भरभराट व्हावी म्हणून मुंबईचा नोकरदार भाऊ काबाडकष्ट करतो. कर्जाचा बोजा सहन करतो, पण त्या बदल्यात त्याच्या वाट्यास विटंबना आणि अवमानच येतो. खेड्यातला साधा भोळा माणूसही आता बिलंदर किंवहुना स्वार्थी झालेला आहे. पगारदाराला वाटाण्याच्या अक्षता देऊन झटपट 'मालदार' बनण्याचा प्रयत्न हा खेडूत भाऊ करतो. ह्या कथेद्वारे नीतिमूल्याच्या अभावी समाजाचा होणारा ऱ्हास आणि आपमतलबीपणा ठाणगे व्यक्त करतात.

'डफडं' हीसुद्धा यदूच्या टिपरुकाप्रमाणंच वाचकाच्या काळजावर हळुवार आघात करते. त्यातील भेदाभेद, त्याची तीव्रता सहन करणारा परंतु स्वाभिमानी यदू दलितांनाही स्वाभिमान असतो हे दाखवून देतो.

अनुभवाचा सच्चेपणा आणि ताजेपणा, साधे, स्पष्ट आणि सरळ निवेदन, ग्रामीण वातावरणाचे सजीव आणि हुबेहूब वर्णन आणि 'माणूस' मग तो शहरातला असो अथवा खेड्यातला ह्याच्याबद्दलची कणव हे या संग्रहाचे प्रमुख विशेष.

( मातरं : गंगाधर ठाणगे, अजय प्रकाशन, मुलुंड, मुंबई ८०, पृष्ठे १५६, पंचेचाळीस रुपये )

---

- **मनमातीचे** – मनीषा पिंपळखरे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे ५६, रु. २७.५०, १९८८.
- **वाग्विलास** – कवि मोरया, संपा. वा. के. लेले, काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी २२१००५, पृ. १२२, पंचवीस रुपये, १९८८.

---

# अखेरचे पर्व : विजया राजाध्यक्ष

## थोड्याफार उन्मुक्त जीवनाची चव चाखणाऱ्या नायिकांच्या कथा

–प्रा. सौ. शुभा चिटणीस

विजया राजाध्यक्ष ह्यांचा हा चौदावा कथासंग्रह. या कथा १९८५–८६ सालच्या दिवाळी अंकांतून आलेल्या आहेत. माणसाचा शोध, स्वतःचा शोध आणि जीवनाचा शोध प्रतिमा–प्रतीकांच्या साह्याने घेणाऱ्या या कथांचे मुख्य वैशिष्टय म्हणजे या कथा प्रश्न मांडतात, उत्तरे देत नाहीत. लेखिकेला इवलासा प्रसंग, एखादद्सरी बारीकशी घटना, भावनेचा एखादा तरंग कथेसाठी पुरा असतो.

एक स्त्री स्त्रीच्या प्रश्नांकडे कशी बघते हे रंगवताना त्या गडद रंग वापरत नाहीत किंवा भावविव्हळ होत नाहीत. या कथा जेवढचा मेंदूला खाद्य पुरवतात तेवढचा तीव्रतेने हृदयाला भिडत नाहीत. ('आभाळ', 'संघर्ष', 'खेळ')

स्वयंपाकघरालाच सत्ताकेंद्र न मानता बाह्य जीवनाशी संपर्क असावा म्हणून जाहिरात कंपनीत नोकरी करता करता, 'स्वतः'च्या शोधात निघालेली स्त्री 'स्वतःसाठी' ह्या कथेत भेटते. मात्र तिची सासू पण आपले वेगळेपण ठेवून असते ते तिला सासू गेल्यानंतर तिच्या वह्यांतून कळते. तिला जाणवते की 'एका मुक्त न होऊ शकलेल्या स्त्रीचा मुक्तीच्या उंबरठ्याशी पोचलेल्या स्त्रीबद्दलचा द्वेष ! पण नुसता द्वेषच नव्हे तर आकर्षणही ! जुने वळण मोडू न शकणाऱ्या स्त्रीची नव्या वळणाने जाणाऱ्या स्त्रीशी संवाद साधण्याची ती धडपड होती !'

घुसमटणाऱ्या नायिकांच्या वेदनांना वाचा फोडण्याचा आणि स्वतःचे नेमके स्थान शोधण्याचा प्रयत्नही दिसतो. 'निपुत्रिक' कथेतील दोन मुलांच्या आईचे भंगलेले हृदय चटका लावून जाते. एक मुलगा विधवा श्रीमंत आत्याकडे दत्तक जातो. तर दुसरा आईशी संवादच ठेवीत नसतो.

'अखेरचे पर्व' कथेतील शारदा अधिक कणखर, ताठ कण्याची दाखवली आहे. तीन–तीन स्त्रियांशी संबंध ठेवून, बेताल जगलेला नवरा अखेर घरी परत येतो. त्याला शारदा घराच्या गच्चीवर खोली देऊन त्याची स्वतंत्र, उत्तम व्यवस्था ठेवते. समंजस वागणूक देते. तेव्हा दिनकरला वाटते– 'शारदाने स्वतंत्रपणे राहून मुलांना डॉक्टर, वकील केले. लग्ने केली. चांगल्या सद्गुणी सुना आणल्या. लेक सुस्थळी दिली. स्वतः शारदा या घरावर हिरव्यागार वेलीसारखी पसरलेली आहे. आपली जागा कुठे आहे या घरात ?'

चाळिशीच्या टप्प्यावर पोचलेल्या स्त्रीला 'आपण अजून सुंदर दिसतो' हे वाक्य नव्या, स्वच्छंदी जीवनाकडे आकर्षित करते. ही धुंदी शर्माच्या बोलण्यानं धाड्कन उतरते. 'आय ॲम मॅरिड. हाऊ कॅन आय फरगेट इट ? तुझं हे पझेसिव्ह वागणं सोडून दे. अखेर आपल्या नात्याला तसं कोणतं बंधन आहे ?'

देह, देहाचे वासनाधर्म, प्रीतीतील स्वप्नाळूपण, प्रौढ स्त्रीची रतिक्रीडेनंतरची भावावस्था, विवाहितांच्या गुंतवणुकी अशा वेगवेगळ्या प्रश्नांभोवती विजयाबाईंच्या कथा गुंफलेल्या असतात. स्त्रीची भावनिक तडफड त्या अत्यंत प्रभावीपणे मांडू शकल्या आहेत. 'तो एक क्षण', 'फुलं' सारख्या कथा क्षुद्र स्वार्थाचे घुमारे दाखवतात. पांढरपेशा, सुखवस्तू जीवनाकडे विजयाबाईंचं लक्ष अधिक केंद्रित दिसते.

पार्टर्या, ड्रिंक्स, हॉटेल, गाड्या, भारी साड्या आणि क्लब या वर्तुळातील जीवन दाखवताना त्या एका कथेत म्हणतात, 'मला वाटतं, शालिनी, संस्कृती ही माणसावर लादलेली गोष्ट आहे. संधी सापडताच तो तिचं जोखड भिरकावण्याचा प्रयत्न करतो ! जंगलात शिरतो. कुलकर्णी शिरले तसे !' ( फुलं )

श्रीमंती भोगण्याकडे कल असलेल्या माणसांची घरं हरवलेली, संवाद हरवलेले असे चित्रणही खूपदा येते. ('आभाळ', 'खेळ') 'उद्ध्वस्त'ची नायिका 'सुवर्णा' का मोडून पडते ह्यावरचं भाष्य खूप बोलकं आहे. 'तिच्यापेक्षा आमच्या सारख्यांचं आयुष्य बरं. आम्हाला आघातांची, नकारांची सवय असते.'

वेगळ्या वाटेनं, काहीशा उन्मुक्त जीवनाची चव चाखत जगण्याच्या धडपडीत ताणतणाव सोसणाऱ्या नायिका, सध्याचे 'वेगळं वळण' ह्या कथा संग्रहातून मांडताना दिसतात !

(अखेरचे पर्व : विजया राजाध्यक्ष, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, ५० रु.)

---

# मंझधार : अनुराधा पोतदार

## भावकवितेचा दुसरा सूर

—डॉ. अरुणा ढेरे

अठ्ठ्याऐंशी सालाच्या अगदी अखेरीस सुरेश एजन्सीनं, 'मंझधार' हा अनुराधा पोतदारांचा कवितासंग्रह प्रसिद्ध केला आहे. 'आवर्त' हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह आणि नंतरचा 'कॅक्टसफ्लॉवर' या दोन संग्रहांमध्ये एक मोठा प्रवास जाणवतो. नवथर प्रीतीचे पहिले उद्गार सोशिक, अनुभवी आणि समंजस प्रेमभावनेत परिणत व्हावेत आणि बघता बघता कालपरवापर्यंत फुलपाखरासारखे

उडत चाललेले घटनाप्रसंग, मनावर एक जाणती मुद्रा उमटवण्याइतके प्रत्ययकारक रीतीने अनुभवास यावेत इतकं हे दोन संग्रहांमधलं अंतर तोडलं गेलं आहे.

'मंझधार' हा 'कॅक्टसफ्लॉवर' नंतरचा संग्रह. साठीच्या उंबरठ्याशी उभ्या राहिलेल्या कवयित्रीचे पाय आता जीवनाच्या मातीनं कसे मळले आहेत, प्रवासानं कसे हुळहुळते दुखरे झाले आहेत आणि उंबरठ्यापलीकडे एक विश्रांतिस्थान भेटावं असं तीव्रतेनं वाटत असतानाच, ते भेटलं नाही तर फक्त सोसणंच अटळ आहे, याचीही जाणीव मनात कशी स्पष्ट आहे हे 'मंझधार'मध्ये पाहावं.

संग्रहातल्या नव्वदीच्या घरातल्या कविता तिपेडी आशयाच्या आहेत. दु:खाचा एक उदास गडद रंग त्यांना चढलेला. दु:ख स्त्रीत्वाचं, प्रीतीचं आणि आईपणाचं. एक संवेदनाशील स्त्रीमन असंख्य अनुभवांमधून जाता जाता कसं दुखतं, होरपळतं आणि तरी त्या अनुभवांच्या पोटी असलेलं कातर कोवळं दु:ख कसं आपलंसं करू पाहतं, ह्याचा कितीतरी कवितांमधून प्रत्यय येतो. अगदी कविते-संबंधीच्या कवितांमधूनही जाणवते ती स्त्रीत्वाचीच एक तीव्र करुण धार.

संग्रहातल्या प्रेमकवितांना तर उदासीचा, दु:खाचा मोठा टिळा लागला आहे. वाटतं, की या कवयित्रीला प्रेम भेटलं आहे ते जखम होऊनच. अनेकदा अनेकांना हे प्रेम असं जखमी करतं की त्याच्या लखलखत्या धारेवर कविता रक्ताच्या ताज्या उष्ण चिळकांडीसारखी बेभान उंच जाते. किंवा जीवनाकडेच धारदार नजरेनं पाहण्याची एक ताकद त्यातून निर्माण होते. किंवा आयुष्य बेगुमानपणे उधळून देण्याची ऊर्मी जागता जागताच त्या एका उधळणीच्या क्षणी आयुष्याचं सारच हाती येतं. कवयित्रीला प्रेम यापेक्षा वेगळं भेटलं आहे. त्यानं तिला विकल तर केलंच आहे पण सोसण्याची सगळी ताकद एकवटून आता कुठे ती त्या प्रीतीकडे, प्रीतीनं केलेल्या जखमेकडे स्थिरपणे पाहू शकते आहे. आयुष्याच्या या वळणावर, एवढी वर्षे मागे टाकल्यावर 'मंझधार' मधल्या प्रेमकवितेतला हा धीर आणि समंजसपणा आपल्याही ओठावर एक जाणतं उदास हसू आणतो. समजून घेणारं हसू आणतो.

तसंच समजूतदार स्मित आईपणाच्या दु:खासाठीही असतं. तरुण लोभस स्त्रीत्वातून उठून डौलानं आणि अभिमानी ताठपणे उभं राहिलेलं हे रसरशीत आईपण नाही. कासावीस झालेलं, अगदी प्राण पणाला लावून नेटानं उभं असलेलं हे कमालीचं एकटं आईपण आहे.

असा तिपेडी दु:खाचा पीळ म्हणजे 'मंझधार' मधली कविता. संग्रहाच्या अखेरीला एक परिशिष्ट आहे. बाईंनी स्वत:चे आणि कवितेचे नाते तिथे उलगडून घेतले आहे. स्वत:साठी आणि आपल्यासाठी. दीर्घ काव्य प्रवासानंतरच्या या तिसऱ्या संग्रहाच्या टप्प्यावर आवश्यक, हवेसेच असणारे हे सिंहावलोकन आहे.

आता 'मंझधार' नंतरची कविता कशी असेल? आजवरच्या काव्यप्रवासात

'वैयक्तिका' च्या वळावरच कवयित्रीने धीर एकवटून एकाकी पावलं उचलली. ती एका उंबरठ्याशी येऊन थांबली. आता ही वैयक्तिकाची सीमारेषा तिच्याच आत्मबळाने ती धूसर करेल ? तिला पुढच्या प्रवासात बाहेरचे अमर्याद जग आणि त्यातले लखलखते अनुभव अगदी नक्कीच वळ देऊ शकतील. उतरणीवरची उन्हं वेचताना तिला सहजतेने रेषेची जाणीव विसरून आत बाहेर वावरता येईल. त्या वावरण्याची कविता म्हणजे पुढची कविता असेल ?– असेल असे वाटावे इतकी आशा 'मंझधार' ने लावली आहे.

(मंझधार – डॉ. अनुराधा पोतदार, सुरेश एजन्सी, पुणे. २५ रुपये)

# शूर मर्दांचा पोवाडा : वसंत बापट

## ओजस्वी वीर कहाण्यांचा नजराणा

आल्हाद काबाडी

'रंगदेवते, मंगलमाते, भराभरा भर रंग
लोकरंजनी तुझ्या पूजनीं करी सदोदित दंग ।।
शिकव आम्हाला सगनभाऊची सगुण लावणी ग
शिकव आम्हाला रामजोशीची कोकिळ वाणी ग
शिकव आम्हाला होनाजीची बुलबुल राणी ग
परशुराम कविचे गोड ते छंद, धुंद बेबंद,
देति आनंद, न हो रसभंग
अशि तऱ्हा शिकव शाहिरा, उसळु दे जरा,
खरा रसरंग ।।'

अशा विनम्र शब्दांत रंगदेवतेची विनवणी करणाऱ्या कविवर्य वसंत बापट यांच्या विविध पोवाड्यांचे पुस्तक ९ ऑगस्ट १९८८ क्रांतिदिनी 'साधना' प्रकाशनाने प्रसिद्ध करून अनेक प्रकारे औचित्य साधले. ९ ऑगस्ट १९४२ ला मुंबईत गवालिया टँक मैदानावर महात्माजींनी ब्रिटिश राज्यकर्त्यांना 'चले जाव' सांगून स्वातंत्र्य आंदोलनातील निर्वाणीच्या पर्वाला प्रारंभ केला आणि उसळत्या रक्ताच्या या तरुण कवीने त्यात उडी घेतली. १९४३ ते १९४५ ही वर्षे भूमिगत अवस्थेत गेली, तुरुंगात गेली आणि त्यामुळे कॉलेज शिक्षणात खंड पडला. ते मंतरलेले दिवस या संवेदनाशील कवीला भारावून टाकणारच. विशेषतः ४२ च्या आंदोलन काळात वसंत दाते या त्यांच्या मित्राला महाडच्या गोळीबारात

वीरमरण आले आणि त्यांच्या तोंडून सहजोद्गार वाहेर पडले, ' स्वातंत्र्याचा नाद घुमविला ज्याने पहाडापहाडात। वसंत दाते अमर जाहला प्राण अर्पुनी महाडात ॥ '

वसंत दातेचा पोवाडा आकाराने लहान असला तरी अतिशय हृदयस्पर्शी आहे. ४२ च्या आंदोलनातील भाई कोतवाल आणि शिरीषकुमार यावर दोन स्वतंत्र पोवाडे त्यांनी रचले आहेतच. त्याशिवाय धर्मवेड व जातीयता यांच्या सीमा पार करून काश्मीरमधील हुतात्मा मकबूल शेरवाणी याची वीरकथाही त्यांनी एका विस्तृत पोवाड्यात प्रभावीपणे सांगितली आहे.

या पोवाड्यांची निर्मिती थोरांच्या व्यक्तिजीवनाने भारावून गेल्यामुळे किंवा प्रक्षोभक घटनांमुळे झाली. त्यामुळे छत्रपती शिवराय, लोकमान्य टिळक, गांधीजींची जीवनयात्रा, सरहद्द गांधी बादशहाखान यांच्या वीरकहाण्या त्यांनी ओजस्वी भाषेत कथन केल्या आहेत. तसेच पहिले स्वातंत्र्यसमर, स्वातंत्र्यसूर्य उगवला, काश्मीरवर घाला, गोमंतकाचा मुक्तिसंग्राम आणि संयुक्त महाराष्ट्र या घटनांचीही बोलकी व ठसठशीत नोंद घेतली आहे. या सगळ्या पोवाड्यांचा हा संग्रह म्हणजे जणू स्वातंत्र्य-संग्रामाचा आलेखच ! त्याशिवाय लोकरंजनातून लोकशिक्षण करण्याच्या जाणिवेने त्यांनी ' दारूची कहाणी ' हा अत्यंत प्रेरणादायी पोवाडाही लिहिला आहे. प्रत्येक पोवाड्यातून शाहीर आपल्याशी हृदयसंवाद करीत आहे आणि त्यातील उत्कर्षबिंदू ओळखून तेथे उत्कट भावनेचा परिपोष करण्यात यशस्वी झाला आहे.

आधुनिक मराठी कवींमध्ये इतके विपुल व गुणसंपन्न पोवाडे वसंत बापट यांनीच रचलेले आहेत. मात्र त्यांच्या नवनवोन्मेषशाली काव्यप्रतिभेचा हा केवळ एक पैलू आहे. त्यांची भाषाशैली आवेशयुक्त, परिणामकारक आणि मनातल्या भावांचा सहजाविष्कार करणारी आहे. अन्याय, भ्रष्टाचार, वेडगळ रूढी यांच्या भाराखाली पिचणाऱ्या सामान्य माणसाची वेदना ते शब्दांची शस्त्रे करून व्यक्त करतात. त्यांच्या शाहिरी काव्यांतील सुंदर शब्दकला आणि सुबोध अर्थ तर अतिशय वाखाणण्याजोगे आहेत. त्यांच्या काव्यांत अचूक शब्द जसे चपखलपणे येऊन जागीच स्थानापन्न होतात तसेच शब्द वाकविण्याचे सामर्थ्यही त्यांच्या सिद्धहस्त लेखणीत प्रत्ययास येते. त्यांची शब्दांवरील हुकुमत किती प्रभावी आहे, हे कोणताही पोवाडा वाचताना चटकन जाणवते.

(शूर मर्दाचा पोवाडा : वसंत बापट, साधना प्रकाशन, पुणे, पस्तीस रुपये)

---

- **सिझफायर** – राम देशमुख, सुप्रिया प्रकाशन, १२ झपूर्झा, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व) मुंबई ४०० ०५१, पृ. ५८, १२ रु.
- **श्रावणमेघ** – पद्मा, मौज प्रकाशन, खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४०० ००४, पृ. १०४, ४४ रु., १९८८.

---

# आघात : कवी संजीव

## शोषितांवरील अन्यायाची कैफियत

दिवाकर श्रीधर दुनाखे

जनता-जनार्दनाच्या मनाची पकड घेणारे लोकनाट्य लिहिणारी, रसराज शृंगाराची विविध छटा दाखविणारी तसेच कारुण्य, शौर्य, कोमलता, भक्ती, प्रीती या रसांचा साक्षात्कार घडविणारी कवी संजीव यांची लेखणी, शोषितांवरील अन्यायाने पेटून 'आघात'मध्ये प्रकट झाली आहे.

टाकसाळ या कवितेत बलदंडांनी चालवलेल्या बलात्काराबद्दल ते म्हणतात—

या वीर्यपतनांचा टिळा लावूनच
पुन्हा नवे वारस जन्मतात
पुन्हा हेच करण्यासाठी
अशी ही कातडयाची टांकसाळ
चालू आहे तिन्ही त्रिकाळ

'कातडयाची टांकसाळ' हा शब्दप्रयोग कोणालाही अस्वस्थ करील.

मुखवटे धारण करण्याबद्दल त्यांना राग नाही. परंतु—

प्रतिष्ठितांना हे मुखवटे विकत घेता येतात
शोषितांना मात्र मुखवटेच नसतात
आम्ही ते घेऊ शकत नाही
आमचे खिसे रिकामेच असतात
त्याहून आमचे हात छाटलेले असतात

ही त्यांची खरी खंत आहे. शोषितांच्या छाटलेल्या हातांबद्दल त्यांना हळहळ वाटते. अशा तऱ्हेने पिळल्या गेलेल्या, पिळणाऱ्यांच्या चरकांत दबून नरकयातना भोगलेल्या व भोगणाऱ्या सर्व प्रकारच्या शोषितांबद्दल त्यांना अपार सहानुभूती वाटते. त्यांच्यावर झालेल्या—होणाऱ्या अन्यायाची चीड येते— संताप येतो— तो त्यांनी त्यांच्या 'चोखामेळा' 'चोर' 'भूक' 'ब्लॉटिंगपेपर' 'कॉम्पेनसेशन' 'तुम्ही' 'मैलाचे दगड' खापर' 'हलगीवाले' वगैरे कवितांतून प्रभावीपणे मांडला आहे. 'मैलाचे दगड' मधील व्यथा अत्यंत बोलकी व सजीव आहे—

आमचं आयुष्य एक रटाळ यात्रा
आमची पालखी नाही दिंडी नाही

कुणाचे तरी टाळ, कुणाचे तरी फड
फक्त मोजायचे मैलाचे दगड
आम्हाला आगा नाही पिछा नाही
वर्तमानावरोवर आम्हाला भविष्य नाही

असे दारुण निराशेचे उद्‌गार प्रत्येक शोपितांच्या जिभेवर असतात. ते त्यांना व्यक्त करता येत नाहीत– त्यांचा उच्चार करता येत नाही– त्याला संजीवांनी वाचा फोडली आहे– ज्यांचा वर्तमान व भूतकाळ अंधाराच्या गर्तेत रुतला आहे, त्याला भविष्याचा सूर्य कसा आणि कुठून दिसणार ?

वृत्तवद्ध, छंदवद्ध काव्यरचना करण्यात संजीव यांचा हातखंडा आहे. त्यांची गझल रचना आशयाच्या आणि अर्थाच्या बाजूने सरळ–सोपी झाली आहे. परंतु त्यातील प्रेरक विचारांमुळे व कवीचे सहजोद्‌गार म्हणून त्याकडे दुर्लक्ष करावे. शेवटी दुःख, वेदना, नैराश्य, अन्यायाची चीड, आदर्शाची ओढ, जीवनावरचे प्रेम या साऱ्या विशेपांनी अंतर्बाह्य रंगलेली ही आघातमधील संजीवांची कविता मनाला मोहवीत नाही पण मनाचा दाह करते असे जे डॉ. निर्मलकुमार फडकुले यांनी 'आघात 'वद्दल म्हटले आहे ते हा संग्रह वाचून सार्थ व यथार्थ वाटते.

( आघात : कवी संजीव, सोलापूर, वीस रुपये )

---

# विदेश दर्शन : यशवंतराव चव्हाण

## रसिकता आणि शासकीय जागरुकता–दोन्ही अंगांचे दर्शन

म. श्री. दीक्षित

राजकारण आणि प्रशासन या कार्यात अहोरात्र मग्न नि व्यग्र असताही ज्यांनी आपली रसिकता, सदभिरुची आणि ज्ञानोपासना शावूत ठेवली, किंवहुना जोपासत ठेवली अशा काही विख्यात व्यक्तीत कै. यशवंतराव चव्हाण यांचं नाव आवर्जून घ्यावं लागतं. 'विदेश–दर्शन' हे त्यांच्या पश्चात प्रकाशित झालेलं प्रवासवृत्तात्मक पुस्तक त्यांच्या कीर्तीला साजेसेच आहे. भारताचे संरक्षण, अर्थ आणि विदेशमंत्री असतानाच्या काळात ( १९६२ ते १९७७ ) यशवंतरावांनी जगातील लहानमोठ्या देशांचे जे दौरे केले त्यांचं पत्ररूप विहंगमदर्शन या पुस्तकात घडतं आणि ते झाल्यावर 'यशवंतराव राजकारणात नसते तर साहित्यिक झाले असते' अशीच रसिक वाचकाची प्रतिक्रिया उमटते. विदेश दौऱ्यांवर असताना

यशवंतराव सौ. वेणूताई यांना पत्रे पाठवून प्रत्येक देशाचं तेथील निसर्ग नि लोक-जीवनासह धावतं दर्शन घडवीत असत. त्यामुळे चव्हाण पतिपत्नींच्या स्निग्ध दांपत्य-जीवनाची एक हळवी सावलीही या पत्रांसोबत वाचकांची सोबत करते. एकूण ९७ पत्रांची ही माला यशवंतरावांचे सांगाती पत्रकार श्री. रामभाऊ जोशी यांनी मोठ्या प्रेमादराने गुंफून प्रकाशात आणली याबद्दल त्यांना धन्यवाद द्यायला हवेत.

'विदेश–दर्शन' या पुस्तकात राजकारणी यशवंतरावांपेक्षा त्यांच्यातील 'माणसा'चं दर्शन अधिक प्रकर्षाने जाणवतं आणि हे दर्शन मोठं विलोभनीय आहे. गाढ पत्नीप्रेम तर अनेक पत्रांतून प्रतीत होतं. परदेशात काही उत्तमउदात्त, भव्य-दिव्य पाहिलं–अनुभवलं की या माणसाला पत्नीची हटकून आठवण येते नि शारीरिक दुर्बलतेमुळे ती आपल्यासंगे येऊ शकली नाही याची रुखरुख व्यक्त होते. ८९ वे संपूर्ण पत्र या दृष्टीने वाचण्यासारखं आहे. यशवंतरावांचं मातृप्रेम आणि कुटुंबातील इतर माणसांविषयीचं ममत्व दृग्गोचर होणारी काही पत्रं अशीच बोलकी आहेत. वालीब्रेटाच्या वर्णनपर पत्रात लेखकाच्या मनातील व्यापक स्वधर्मनिष्ठा सहजपणे प्रकट होते, तर डॅन्यूब नदीच्या परिसरात रमताना त्याला कृष्णाकाठची आठवण येते. नद्या, डोंगर, शेतं, झाडं, पिकं हे सारेच त्यांच्या हिरव्या मनाचे वर्ण्यविषय बनतात. जिनिव्हा सरोवर, डॅन्यूब नदीचा परिसर, अंकाऱ्यातील सूर्यास्त-चंद्रोदय इत्यादींचं लेखकाने केलेलं चित्रण हृद्य उतरलं आहे. पृ. १३६–३७ वरील प्रकट झालेलं प्रांजळ राजकीय चिंतन बरंच अर्थपूर्ण आहे. काँग्रेस आणि इंदिरा गांधी यांच्याविषयी अखेरच्या दिवसात यशवंतरावांच्या मनात कोणतं काहूर माजलं होतं याची सूचक साक्ष देणारा हा मजकूर अभ्यासकांनी पुनःपुन्हा वाचावा असा आहे.

साहित्यिकांच्या व कलाकारांच्या वर्तुळात यशवंतराव लोकप्रिय का होते याचं रहस्य प्रस्तुत पुस्तकाच्या वाचनाने सहजगत्या उलगडतं. काव्य, नाट्य, नृत्य, संगीत इत्यादींचा आस्वाद घेत घेत हा माणूस विदेशदौऱ्यात राजनैतिक कर्तव्यं पार पाडत होता ही विशेष लक्षात घेण्याजोगी गोष्ट आहे. रसिकता नि सौंदर्य-दृष्टी, क्वचित विनोदबुद्धी सर्वत्र ताजीतवानी आहे. हवाईसुंदरीप्रमाणे युगांडाचा दांडगेश्वर इदी अमीनही त्यांच्या विनोदबुद्धीचा विषय बनतो.परदेशातील भव्य वस्तुसंग्रहालये, ऐतिहासिक वास्तू आणि ग्रंथभांडारे पाहून हा माणूस जसा भारावून जातो, तसाच भारी किंमतीचे ग्रंथ विकत घेऊ शकत नसल्याने खंतावूनही जातो. घार आकाशात भरारत असताना तिचे लक्ष आपल्या पिलांकडे असते तसे विदेश-दौऱ्यांवर असतानाही त्यांचे भारतातील राजकीय स्थितीकडेही लक्ष असते. सारांश माणूस आणि शासनकर्ता या उभय नात्याने यशवंतराव कसे होते याचं धावतं दर्शन प्रस्तुत पत्रसंग्रहात चांगलं घडतं. प्रवासवर्णनात्मकतेपेक्षा पुस्तक आत्मवृत्ताकडे झुकलं आहे असंही वाटत राहतं.



अनुक्रमणिका

**प्रा. अविनाश भडकमकर**

'विदेश–दर्शन' हे प्रवासवर्णनात्मक पुस्तक असले तरी ग्रंथलेखनाच्या जाणीवेने सलग बैठकीत लिहिलेले नाही. नोव्हेंबर १९६३ ते जानेवारी १९७७ एवढ्या दीर्घ कालखंडात, मंत्री असताना यशवंतराव चव्हाण यांना जो परदेश प्रवास करावा लागला त्या काळात त्यांनी आपल्या पत्नीला पाठविलेली ही पत्रे आहेत. आणि तरीही संपादक म्हणतात त्याप्रमाणे, 'प्रवासवर्णन' म्हणून जो ललित साहित्याचा सुप्रसिद्ध आकृतिबंध आहे तो आकृतिबंध या पत्रव्यवहारालाही सहज रीतीने प्राप्त झालेला आहे.'

सर्वसाधारण प्रवासवर्णनांपेक्षा मला जाणवलेले 'विदेश–दर्शन'चे आगळे विशेष असे की या पुस्तकात केवळ आशिया, आफ्रिका, युरोप, अमेरिका आणि अन्य देश यांचा भूगोल आणि राजकारण यांचा परिचय करून दिलेला नाही. मुळात ही पत्रे पत्नीला उद्देशून लिहिली असल्याने त्यांना एक घरगुती आणि कौटुंबिक अशी स्वाभाविक भावच्छटा प्राप्त झाली आहे. शिवाय यशवंतराव राजकीय संबंधापेक्षा निरनिराळ्या राजकीय आणि मुत्सद्दी व्यक्तींतील 'माणसा'ला अधिक महत्त्व देतात. त्यात व्यक्तिगत संबंधांना आणि भावनिक गुंतागुंतीलाही ते उचित स्थान देतात. एक उदाहरण देतो. श्रीमती क्रॅफ्टस् (वय सुमारे ५०) शेजारी होत्या. बायकांचा नेहमीचा प्रश्न त्यांनी विचारला. कुटुंब किती मोठे आहे? मी सांगितले आम्ही फक्त दोघेच आहोत. त्यांनी विचारले की, मग पत्नीला एकट्याच टाकून कसे आलात?

तेही दोघेच आहेत. त्यांनाही मूलबाळ नाही. त्या म्हणाल्या, मी क्रॅफ्टस्-बरोबर सर्व जगभर प्रवास करते. एकटी मागे राहात नाही. क्रॅफ्टस्ही मोठ्या कौतुकाने म्हणतात, 'शी इज ए ग्रेट ट्रॅव्हलर'.

मी त्यांना सांगितले की, मी हा तुमचा निरोप पत्नीला सांगेन. माझा शब्द पाळला आहे. तुझा तुझ्यावर.' (पृ. ११५)

हा मनगोकळेपणा 'विदेश–दर्शन'मध्ये सर्वत्र दिसून येतो. त्यामुळेच मला हे पुस्तक वेगळे वाटते.

(विदेश दर्शन : संपादक–रामभाऊ जोशी, श्री यशोदा प्रकाशन, पत्रकारनगर, पुणे १६. पन्नास रुपये)

---

● **मंजुदीप**–इंदिरा पाटील, गर्जना प्रकाशन, १३०३ ए, शिवाजी पेठ, कोल्हापूर १२ पृ. ५२, १५ रु., १९८८.

---



अनुक्रमणिका

# मागे वळून : मथुताई आठल्ये

## एका व्रतस्थ सेविकेचे आत्मकथन

अजित मगदूम

वयाची पंचाहत्तरी ओलांडलेल्या मथुताई आठल्ये यांनी आपल्या यातनामय जीवनाचा साक्षेपी आलेख 'मागे वळून' या आत्मकथनात्मक पुस्तकात मांडला आहे. डॉक्टर असूनही केवळ बाई व तीही विधवा म्हणून वाट्याला आलेला एकाकीपणा, बहिष्कृतपणा व दुष्टावा यामुळे एका कर्तबगार, जिद्दी बाईला आजूबाजूची माणसे, समाज कसा होरपळून काढतो याची ही मर्मभेदक कहाणी होय.

जन्म साताराजवळच्या कोडोली गावात झाला तरी बालपण साताऱ्यातच गेले. सुरुवातीला साताऱ्याचा त्या काळातला राजवैभवी दिमाख व आजचा बदलता तोंडावळा याचे वर्णन आहे. पाचवीपर्यंत शिक्षण झाल्यानंतर अकराव्या वर्षीच लेखिकेचे लग्न होते. नवऱ्याबरोबर सासूसह लाहोरला जाते. सासूबाईचा विक्षिप्त स्वभाव. त्यामुळे मानसिक त्रास. चार वर्षातच मधुमेहाने नवऱ्याचे निधन होते. सोळाव्या वर्षीच वैधव्य, नवराबायकोचे नाते कळायच्या आतच पतीचा मृत्यू झाल्याने लेखिकेला दुःख होत नाही. उलट सातारला माहेरी कायमचे रहायला मिळणार म्हणून आनंदच.

घरात सनातनी वातावरण त्यामुळे सहा महिने आरशात पाहणे नाही, दागिने नाही, नटणे मुरडणे नाही. फार काय हसायलाही बंदी. ही बंधने हळूहळू सैल होतात. कन्याशाळेत प्रवेश वडिलांवर पुन्हा टीकेची झोड. बायकांनी लिहिणे, वाचणे पाप हा समज. त्या काळात लेखिका आपल्या दुर्दम्य इच्छेने डॉक्टर होते. त्याचवेळी आईचे आजारपण. घरी यायला अडीच वाजायचे त्यावेळी भांड्याच्या तळचा खरपुड्या भात उरलेला असायचा. परिस्थिती विकट. डॉक्टर झाल्यानंतरही विधवा बाई म्हणून अत्यंत क्लेशकारक अनुभव आले. लोकांनी तिच्या व्यक्तिमत्त्वाची सारी अंगे मारली. तिला विरक्त, संन्यासिनी बनवले. सासू व मेहुणे यांच्या कर्मठपणामुळे मनस्तापच मनस्ताप.

डॉक्टर झाल्यावर ससूनमध्ये काही काळ काम. त्यानंतर जुनागड या मुसलमान संस्थानात नोकरी. तिथले धर्मांध वातावरण, डॉक्टरांनी चालवलेली सामान्यांची पिळवणूक, अंधाऱ्या घरात रात्री अपरात्री जाऊन करावी लागणारी बाळंतपणे असे अनेक चाकोरीबाहेरचे अनुभव येतात.



अनुक्रमणिका

पुढची नोकरी सेवाग्रामला. तिथे संडास साफ करणे, बैलगाडीचा प्रवास, हरिजन वस्तीत जाऊन लोकांची सेवा करणे यापेक्षा तिला मिळालेल्या डॉ. राजेंद्र प्रसाद, मशुवाला, ठक्करबाप्पा प्यारेलाल अशा मान्यवरांच्या सहवासाचे अप्रुप वाटते. त्याचप्रमाणे गांधीजींचे अनुयायी म्हणविणारे कसे उथळ, दांभिक व तऱ्हेवाईक होते यावरही प्रकाश पडतो.

कस्तुरबा ट्रस्ट तर्फे केंद्र तपासणी निमित्त भारतभर भटकन्ती. लेखिका निर्मोही, निष्ठावंत सेविका. पिंड कार्यकर्तीचाच. गैरसोयी, शारीरिक त्रास याची पर्वा नाही.

कस्तुरबा ग्राममध्ये ग्रामसेविका, दाई कोर्सेस यासाठी खूप बायकांना प्रवेश दिला जाई. पण त्यांना शिकण्यात स्वारस्य नसे. नापास झाले तरी महिना रुपये साठ मिळतच. राजेंद्र प्रसादांच्या भेटीच्या वेळी अहिंसातत्त्व गुंडाळून त्यांना कुत्र्यांचा त्रास होईल म्हणून विष घालून मारून टाकण्यात येते याची बोचणी लेखिकेला लागून राहते. लेखिकेच्या निष्ठेच्या व नेकीच्या कामाची पावती अनेक मंत्री देत परंतु सहकारी मात्र हेवा-दुस्वास करीत. सुशीलाबाई पै यांच्याशी वादावादी होऊन व सेवाग्रामला रामराम करावा लागला.

शेवटी ' रुग्ण हाच देव ' हे ब्रीद असणाऱ्या घटप्रभेच्या आरोग्यधामात पुढची नोकरी. आदर्श वातावरण. पैशापेक्षा आरोग्याला महत्त्व. गरीबालाही मोफत औषध, कार्यकर्तेही कुटुंबियांसारखे रहात. जिथे काम करतो त्या संस्थेलाच गिळंकृत करणारी नीती कुठे अन् हक्काच्या महिन्याभराच्या रजेच्या काळातला पगार घेण्याचा नैतिक अधिकार नाही म्हणून साभार परत करणारी मथुताईसारखी उत्तुंग माणसे कुठे ! २५ वर्षांच्या प्रदीर्घ, सचोटीच्या सेवेनंतर घटप्रभाही सोडावे लागते. त्याची सल अखेरपर्यंत बोचत राहते. डॉ. हर्डीकर म्हणायचे ' मथुताई तुमची लाकडं गवऱ्या इथंच आहेत.' पण तसे झाले नाही. शिड फाटलेल्या जहाजासारखी त्यांची अवस्था झाली. आयुष्यभर मोफत औषध देणाऱ्या दवाखान्यात काम करून शेवटी स्वतःच्या आजारपणात दवाखान्याचा खर्च परवडत नाही म्हणून बरगड्या मोडलेल्या अवस्थेत घरी यावे लागले. आयुष्यात जे जे मिळाले ते ते मुक्तहस्ताने लोकांना दिले. भिडस्त, संयमी, निःस्वार्थी, करारी, ध्येयवादी, समाजप्रेमी स्थितप्रज्ञाचा हा प्रदीर्घ जीवनपट वाचकाला अंतर्मुख करून जातो. घटनांची नीट जुळवाजुळव झाली असती तर पुनरावृत्ती टळली असती. तरीही मनातील स्पंदनांचा प्रामाणिक आविष्कार असल्याने हे आत्मकथन भिडते व विचार करायला लावते.

( मागे वळून : मथुताई आठल्ये, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. ३५ रुपये. )

---

● **चांदण** – वसंत आपटे, सौ. कमला वसत आपटे, फोंडाघाट, सिंधुदुर्ग ४१६६०१, पृ. ७६, २५ रु. १९८८.

---

# परंपरा आणि परिवर्तन : सरदार

## सत्त्वांशाचा शोध

डॉ. हेमंत वि. इनामदार

वाचनाच्या वाटचालीत एखादे पुस्तक आपली नजर खिळवून टाकते. त्याचा लेखक स्वतःच्या प्रकट चिंतनातून आपल्याशी हृदय संवाद साधत जातो त्यातल्या विचार सौंदर्यानं मनात प्रसन्नतेचा मळा वहरून येतो. आपल्या अनुभवाचे क्षितिज उंचावत जाते. लेखकाने घडवलेल्या जीवनदर्शनामुळे आपल्या केवळ वाचनाचीच नव्हे, तर उभ्या आयुष्याचीच वाट उजळून जाते. 'ग्रंथु निका जाला असे' अशी पावती आपण मनोमन देऊन टाकतो.

–असा अपूर्व आनंदानुभव 'परंपरा आणि परिवर्तन' या ग्रंथाने मला दिला. कै. प्रा. गंगाधर वाळकृष्ण सरदार यांचे दहा वेचक लेख त्यात आले आहेत. डॉ. मोरेश्वर सदाशिव गोसावी आणि प्रा. विश्वनाथ शंकर चौघुले या दोघांनी ग्रंथांचे संपादन साक्षेपाने केले आहे. नाशिकच्या गोखले एज्युकेशन सोसायटीने दि. २ ऑक्टोवर १९८८ रोजी प्रा. सरदारांच्या ऐंशीव्या वाढदिवसाचे निमित्त साधून, ग्रंथ प्रकाशित केला आहे. दि. १ डिसेंबर १९८८ रोजी प्रा. सरदार कालवश झाले. त्यांच्या हयातीत (आणि त्यांच्या उपस्थितीत) प्रसिद्ध झालेला त्यांचा हा शेवटचा ग्रंथ आहे.

डेमी दोनशे पृष्ठांच्या या ग्रंथाची निर्मिती उत्कृष्ट आहे. प्रा. सरदारांच्या व्यक्तित्वास साजेल असे साधे व सूचक मुखपृष्ठ, सुरेख छपाई, त्यांचे अलीकडचे छायाचित्र आणि सुबक बांधणी हे ग्रंथाचे बाह्य विशेष सुखद आहेत. जून १९८८ मध्ये प्रा. सरदारांनी स्वतःच्या हस्ताक्षरात लिहिलेला समाजविचार त्यांच्या छायाचित्राखाली छापलेला आहे. 'ऐतिहासिक घटनांचे वस्तुनिष्ठ दृष्टीने मूल्य-मापन करण्याची शिस्त जर आपल्या अंगी बाणली, तर केवळ ती सत्यान्वेषणाच्या बाबतीतच नव्हे, तर आपले सामाजिक जीवन निकोप व समंजसपणाचे राहण्या-सही उपकारक ठरेल' या त्यांच्या विचाराचा परिपोष करणारे दहा लेख ग्रंथात समाविष्ट केलेले आहेत. 'ज्ञाननिष्ठा व समाजपरिवर्तन' 'व्यक्ती आणि सामाजिक संस्था, 'स्वतंत्र भारतातील जमेची बाजू' 'समाजवाद व ईश्वरनिष्ठा' 'धर्म-कल्पना आणि महाराष्ट्रीय संत' 'धर्म, शासन आणि आपण' 'स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्य' 'साहित्याची स्वायत्तता आणि केवलकलावाद' 'मराठी भाषा



अनुक्रमणिका

आणि आपण ' व ' दि. के. बेडेकरांचा कलाविचार ' हे मथळे पाहिले, तरी प्रा. सरदारांच्या जीवनदृष्टीची ओळख होईल.

'प्रबोधनातून परिवर्तनाकडे ' ही प्रा. चौघुले यांची पस्तीस पानी विवेचक प्रस्तावना ग्रंथगत विषयांची मार्मिक मीमांसा करणारी आहे. ' नव्या युगाचा नवा आळवू राग ' ही संपादकद्वयाने घेतलेली मुलाखत प्रदीर्घ असून प्रा. सरदारांच्या आयुष्यभराच्या मनन–चिंतनाची ती मंजुषाच आहे. प्रा. सरदारांचा जीवनपट व त्यांची साहित्यसंपदा या शेवटच्या दोन्ही सूची अतिशय उपयुक्त आहेत.

संत आणि समाज याविषयीचे नवदर्शन प्रा. सरदारांनी इथे घडविले आहे. संत कवींचे विवेक मंडण आणि समाजस्थितीचे सर्वस्पर्शी विवेचन त्यांनी केले आहे. संतकवींच्या अध्यात्मनिष्ठ मानवतावादाचे महत्त्व मांडताना त्यांनी संत-कार्याच्या मर्यादाही विशद केल्या आहेत. दलितांची चळवळ व त्यांचे साहित्य यांविषयीची आत्मीयता त्यांनी व्यक्त केली आहे. पण केवळ विघटन व विद्रोह यांच्या भांडवलावर भागणार नाही, त्यास विधायकता व व्यासंग यांची भक्कम जोड हवी आहे, असा इशारा त्यांनी दिला आहे. प्रा. सरदारांचे समाजचिंतन संतत्वाच्या परिमलाने गंधित झाले आहे आणि त्यांच्या संत–मीमांसेला समाज-मनस्कतेचा परिसस्पर्श झाला आहे. त्यामुळेच प्रा. सरदारांच्या या अंतिम ग्रंथात ' विवेकवल्लीची लावणी । हो देई सांध ' ही संत ज्ञानेश्वरांची आकांक्षा सिद्ध झाली आहे.

' समाजाला दिशा दाखवणारे, सामाजिक स्थैर्यासाठी कटिबद्ध असलेले, विपरीत समाजस्थितीत नवा पर्याय देणारे आणि एकूणच समाजाचे प्रबोधन करणारे समतोल आणि साक्षेपी विचारवंत ' ही प्रा. सरदारांची प्रतिमा प्रस्तुत ग्रंथाच्या पानापानांतून प्रगट झाली आहे. रामदासांच्या दासबोधाप्रमाणेच ' परंपरा आणि परिवर्तन ' हा ग्रंथ म्हणजे प्रा. सरदारांचे ' स्वयंसिद्ध रूप ' आहे. १९८८ मधील महाराष्ट्र सारस्वताचा हा मुकुटमणी आहे.

( परंपरा आणि परिवर्तन : गं. बा. सरदार, गोखले एज्युकेशन सोसायटी, नाशिक. एक्कावन्न रुपये )

---

- **बच्चन गीतांजली, विविधा, मधुशाला,** विजयकुमार चौकसे, हिंदी निकेतन पुणे ३०, अनु. रुपये १५, १० व १०.
- **स्मृतिसुगंध** – वरदा प्रकाशन, सेनापती बापट मार्ग, पुणे १६, पृ. २८८, रु. ५०, १९८८.
- **आजचा महाराष्ट्र** – संपादक–पन्नालाल सुराणा, किशोर बेडकीहाळ, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृ. ३६६, रु. १००, १९८८.

---



अनुक्रमणिका

# परिक्रमा : लता राजे

## सामान्यांचे मोठेपण, राजवस्त्रांआडचे अश्रू

सौ. संजीवनी खेर

मला आवडलेले, संग्राह्य वाटलेले पुस्तक आहे 'परिक्रमा'. लेखिका लता राजे. वास्तविक हे पुस्तक त्यांच्या लोकसत्तेतील याच नावाच्या सदरातील लेखांतून निवडून सिद्ध केले आहे. जगभर घडणाऱ्या घटनांचा मागोवा घेणारे हे लेख संग्राह्य व्हायला मुख्यतः दोन कारणे आहेत. एक म्हणजे त्यांची शैलीदार लेखणी व दुसरे म्हणजे त्यांनी उभ्या केलेल्या व्यक्तिरेखा. माहितीचे रंजक सादरीकरण, विवरण व विश्लेषण एवढेच याचे स्वरूप न राहता, ह्या सदरातील व्यक्ती वा घटना ललितकृतीचे सौंदर्य घेऊन वाचकांसमोर येतात. मानवी महत्त्वाकांक्षा, मानवी यश अपयश, नियतीचे अपरिहार्य वळण हे जगातील सर्वात श्रेष्ठ माणसांना सौंदर्यवतींना सत्ताधीशांना वा कोटयधीशांनाही टाळता येत नाही. ह्यात मानवी स्वभाव, नैसर्गिक आपत्ती, राजकीय निर्णयातली अपरिहार्य कठोरता बाईंनी अचूक टिपली आहे. त्यामुळेच अन्यथा जागतिक विषयांवरील लिखाणांसारखे रुक्ष होऊ शकणारे हे पुस्तक अत्यंत रसाळ झाले आहे.

जगाच्या इतिहासातील लक्षणीय व्यक्तींवरील चक्रवर्ती सम्राज्ञीचा स्मृति-सोहळा, जीवघेण्या दीर्घायुष्याचे ओझे, कादंबरीचा सुवर्ण महोत्सव, मूठभर तांदळाच्या धनिणी, गोऱ्या आईची काळी लेक, ज्यां अनुई सारखे लेख आपण विसरू शकत नाही. घटनांमागील मानवी मन बाईंच्या लेखणीतून लख्खकन दिसते, राजवस्त्रांआडचे अश्रू, सृजनशील लेखनाची स्फूर्ती, सामान्यांचे मोठेपण, बाईंच्या लेखणीतून ललितलेखनाच्या चिरंतन सौंदर्याचं लेणे लेवून येते.

( परिक्रमा : लता राजे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. साठ रुपये )

---

- **काही म्हातारे व एक म्हातारी** – विठ्ठलराव घाटे, मौज प्रकाशन, मुंबई ४, पृ. ९२, रु. ४०, तिसरी आवृत्ती, १९८८.
- **जी. ए.–एक पोर्ट्रेट** – सुभाष अवचट, मौज प्रकाशन, मुंबई ४, पृ. ८३, रु. ७५ १९८८.
- **दिवा कुणाचा तेवत नाही** – संध्या कर्णिक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृ. ११० ४० रुपये, १९८८



अनुक्रमणिका

# स्मृति ठेवुनी जाती : गोखले

## मौल्यवान व्यक्तिचित्रांचा सुगंधी गुच्छ

डॉ. गं. वि. नेर्लेकर

गेल्या काही वर्षात मराठी लघुकथांचा घाट ( आकृतिबंध ) व्यक्तिचित्रणाकडे अधिक झुकू लागला आहे. वि. द. घाटे यांच्या 'काही म्हातारे, एक म्हातारीने' याला सुरुवात केली. पुढे प्रा. गंगाधर गाडगीळ, माडगूळकर, वि. ग. कानिटकर यांनी व्यक्तिचित्रणात्मक कथांचा खजिनाच उघडला. श्री. शरश्चंद्र गोखले यांनी 'स्मृति ठेवुनी जाती' ह्या संग्रहात १०-१२ सुंदर व्यक्तिचित्रे सादर केली आहेत.

श्री. गोखले हे सुप्रसिद्ध पत्रकार. समाजशास्त्रज्ञ, समाजकल्याण, अपंगांचे कुष्ठ रोग्यांचे पुनर्वसन, बाल गुन्हेगारांचे प्रश्न यात त्यांना अधिक रस. साहजिकच ह्या क्षेत्रातील काम करणाऱ्यांशी त्यांचा अधिक संबंध आला. जीवनात आलेली ही पाखरे व त्यांची स्मृति त्यांनी शब्दबद्ध केली आहे. यात तुम्हाला बाहू नसलेले पण बलदंड सहस्त्रबाहू असलेले हॅरॉल्ड विल्बी व सपट घोष भेटतील. कुष्ठरोग्यांच्या सेवेची आसक्ती असलेले तपोवन संस्थेचे तपस्वी डॉ. शिवाजीराव पटवर्धन, चुकलेल्या मुलींना मार्गदर्शन करणाऱ्या 'के बाई' ( मिस् डेव्हिस ) महारोग्यांची सेवा करतानाच स्वतःला महारोग होऊन मरण पत्करणारा फादर डेमियन, स्वतः अंध, बहिरी व मुकी असलेली पण आयुष्यभर अपंगांची सेवा करणारी डॉ. हेलन केलर, फिनलॅंडमधील आजन्म अपंगांची सेवा करणारी कु. किर्स्ती व्हाल्व्हीवो ही सर्व व्यक्तिचित्रे डॉ. गोखले यांनी मूर्तिमंत स्वरूपात उभी केली आहेत. सर्वच व्यक्ती उदात्त, ध्येयवादी सेवाव्रती व कर्मयोगी आहेत.

राष्ट्रपती आर. व्यंकटरमण यांचे विशेष बुद्धिवादी, कामगार नेता, रसिक माणूस, साधेपणा, अभ्यासूवृत्ती, निर्णयक्षमता-लेखकाने मार्मिकपणे चित्रित केले आहेत बाबुराव गोखले ( लेखकाचे वडील ) यांचे व्यक्तिचित्र अतिशय बोलके असून जिव्हाळ्याने ओथंबले आहेत. जीवननिष्ठा, शास्त्रोक्त दृष्टी असलेले संभाषणपट डॉ. रावसाहेब पटवर्धन याचे व्यक्तिचित्र वाचकांचे लक्ष वेधूनच घेईल. नामवंत छायाचित्रकार रघु राय याचे जातिवंत कलाकार म्हणून रेखाटन केले आहे. पण उत्कृष्ट प्रशासक आणि सच्चा जाणकार समाजसेवक म्हणून डॉ. बी. जी. घाटे यांचे उभे केलेले व्यक्तिचित्र तर अगदी लाजबाब आहे.



अनुक्रमणिका

तर असा हा ध्येयवादी व्यक्तींच्या चित्रांचा संग्रह त्यांच्याच जीवनातील काही घटिते निवडून, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू दाखविण्यात लेखक डॉ. शरश्चंद्र गोखले यशस्वी झाले आहेत. प्रासादिक भाषा, आटोपशीरपणा, मनोरंजक शैली व काहीशी विनोदाची झालर यामुळे संग्रहाच्या सौंदर्यात भरच पडली आहे.

(स्मृती ठेवुनी जाती : शरश्चंद्र गोखले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पन्नास रुपये)

# देखिला अक्षरांचा मेळावा : पाडळकर

## रसिक वाचकाच्या हळुवार प्रतिक्रिया

**अरविंद पुजारी**

विजय पाडळकरांच्या 'देखिला अक्षरांचा मेळावा 'मधील सर्व लेख प्राय: पुस्तकविषयक, आकाराने आटोपशीर, वाचनीय, चटपटीत. रसिकाला अधिक वाचायला उद्युक्त करणारे. 'मराठवाडा' दैनिकाच्या रविवार आवृत्तीत 'अक्षर-संगत' या सदरामध्ये लिहिलेल्या निवडक लेखांच्या या संग्रहाचे स्वरूप काहीसे श्री. शंकर सारडा यांच्या 'गुलमोहोर' व 'काही पुस्तके काही लेखक' सारखे असले तरी पाडळकरांच्या लेखचाचा वाज वेगळा आहे.

'एक विलक्षण म्हातारा', 'कुछ सही कुछ गलत', 'पिंजरा' 'एक प्रश्न', 'अपुरे पत्र', 'गॉर्की व टॉलस्टॉय', 'एकाकी कलाकार', 'शहामृग' 'शिट्टी', 'दु:खाच्या नाना तऱ्हा', 'अर्पण पत्रिकेचे विश्व', 'कोंबडीची शहाणी पिल्ले' हे लेख उल्लेखनीय आहेत.

लेखक आपले पुस्तक कुणाला तरी अर्पण करतो. लेखकाच्या मनात दडून वसलेल्या ऋण, स्नेह, वात्सल्य वगैरे भावना अर्पण पत्रिकेत प्रतिबिंबित होतात. अर्पणपत्रिका म्हणजे माणसाच्या कृतज्ञता बुद्धीचा मनोज्ञ आविष्कार. हे अनेक दाखले देऊन पटवून दिले आहे.

पुस्तक व लेखक यांची योग्य ती निवड, आकर्षक सुरुवात, कधी गंभीर तर कधी नाटयपूर्ण शेवट, साधी सरळ प्रासादिक भाषा यामुळे पुस्तक अधिकच रंगतदार बनले आहे.

मल्याळी भाषेतील एम. के. मेनन हे लेखक विलासिनी या टोपणनावाने लिहितात. त्यांची 'अवकाशी काल' ही कादंबरी तीन हजार नऊशे पन्नास पानाची आहे. परंतु 'ए बिग बुक इज ए बिग इव्हिल—कॅलिमाकस' हे सगळयाच पुस्तकांना लागू पडते असे नाही. 'एकाकी कलाकार' या लेखात ज्याँ ख्रिस्तोफ ही

महाकाव्यसदृश कादंबरी जीवनविषयक तत्त्वज्ञान सांगून जाते. 'हाऊ सॅड लाईफ इज ?' 'नो नो लाईफ इज नॉट सॅड, ओन्ली सम मोमेन्टस् इन इट आर सॅड.'

पुस्तकाचा परिचय करून देता देताच लेखकाने वाचकांसमोर अनेक प्रश्न उभे केले आहेत. या प्रश्नामुळेच वाचकाला स्वतःचे जीवन परत तपासून पहावेसे वाटते.

'माणसाला जगणे असह्य व्हावे अशी परिस्थिती आपण निर्माण का करतो ?' हा प्रश्न पिंजरामध्ये विचारतात. मध्यम वर्गीयाच्या शहामृगी वृत्तीवर भाष्य करताना पाडळकर लिहितात– 'अखेर सत्याचे ज्ञान म्हणजे आयुष्याची आपली कल्पना आणि वास्तव जीवन यातील अंतर कमी करणेच नाही का ? परंतु या ज्ञानाचा उपयोग काय ? हे प्रश्नचिन्ह सध्या मला भेडसावीत आहे.'

जीवन आणि साहित्य याचा निकटचा संबंध आहे. त्यामुळे साहित्यात वाद निर्माण होतात. 'कुछ सही कुछ गलत' या लेखात प्रसिद्ध हिंदी कवी हरिवंशराय बच्चन यांचे विचार दिले आहेत. ते म्हणतात– 'माझ्या कवितेमुळे जर एखाद्या जिवंत व्यक्तीला आपले आयुष्य संपवावे वाटत असेल तर अशी कविता लिहिणे मी बंद केले पाहिजे.' बच्चननीच आपल्या स्वतःविरुद्ध बंड केले आणि आपल्या कवितेचा चेहरा मोहराच बदलून टाकला.

पाडळकरांच्या या पुस्तकात विविध रंग, छटा, व्यक्ती, आचार, विचार यांची बेमालूम सरमिसळ झाली आहे. आपण एखाद्या साहित्य संमेलनात असून अनेक महान साहित्यिकारांशी वातचीत करीत आहोत असे वाटते.

( देखिला अक्षरांचा मेळावा : विजय पाडळकर, स्वयंप्रभा प्रकाशन, चाफा, पाचवा रस्ता, सिडको, नांदेड. ४५ रुपये )

---

# भटक्यांचे लग्न : उत्तम कांबळे

## भटक्याच्या वाहत्या जीवनाचीही स्वतंत्र संस्कृती

प्रा. भगवान भोईर

दलित साहित्य, आदिवासी साहित्य, भटक्यांचे साहित्य नवे आत्मतेज घेऊन आता मराठी नगरीत येत आहे. उत्तम कांबळे यांचे 'भटक्यांचे लग्न' हे पुस्तक ह्याची साक्ष आहे. महाराष्ट्रात सुमारे ४२ भटक्या व विमुक्त जातीजमाती आहेत. वर्तुळात वर्तुळ असावे, तसे गावात एक गाव असते. गावात स्पृश्यांनी राहायचे,

गावाकुसावाहेर दलितांनी राहायचे. अशी ही गावरचना. पण भटक्यांना ना आपले गाव, ना आपले घर! भटक्यांचे सतत भटकते–वाहते जीवन! ह्या वाहत्या जीवनाचीही एक स्वतंत्र संस्कृती आहे. त्या संस्कृतीचे जीवनदर्शन आजपर्यंत मराठी साहित्यातून घडलेले नव्हते. त्या संस्कृतीच्या 'लग्न' ह्या एका अंगाचे अभ्यासपूर्ण दर्शन या पुस्तकात घडते.

वुट्ट्या विकणारे तसेच वँड सनई वाजविणारे कैकाडी, कुची वांधणारे कूचकोरवी, गावोगावी जाऊन लोहारकाम करणारे घिसाडी दारोदारी जाऊन भविष्य सांगणारे कुडमुडे जोशी, पिंगळे जोशी, पोपटवाले जोशी, लग्नाच्या हंगामात गोंधळ घालणारे गोसावी, गोंघळी, गाढवांच्या पाठीवरून दगडमाती वाहून नेणारे वेलदार, अंगमेहनतीची–हमालीची–कामे करणारे लमाणी, कानातील फुले, जोडवी, अंगठ्या वनवून दारोदार जाऊन विकणारे पंचाळ, रस्त्यावर दगड फोडणारे, पांटा–वरवंटा वनवणारे वडार, रानात फास टाकून ससे, पक्षी पकडणारे फासेपारधी, तारेवर कसरत करणारी गोपाळ जमात, अशा अनेक जातीजमाती आहेत.

भटक्यांच्या लग्नातील काही रूढी पाहाण्यासारख्या आहेत. ब्राह्मण किंवा इतर पुढारलेल्या जातींमध्ये लग्नाचा मुहूर्त ठरवूनच लग्न लावले जाते, म्हणजे शुभवेळ पाहून लग्न केले जाते. भटक्यांतील कैकाडी, पंचाळ, फासेपारधी, नंदीवाले ह्यांची लग्ने मुहूर्त पाहून केली जात नाहीत. त्यांना पुढारलेले का म्हणू नये? काही भटक्या जमातींमध्ये फारच कडक नियम आहेत. गोपाळ जमातीत शनिवारी लग्न लावत नाहीत, मांगगारुडी व नंदीवाले हे लोक केवळ शुक्रवारीच तर श्रीरामभक्त वुधवारीच लग्न लावतात. वंजारी लोक कोणत्याही दिवशी पण सकाळीच लग्न लावतात. वहुतेक भटक्यांची लग्ने हिंदू पद्धतीने लागतात, पण मागगारुड्यांची लग्ने मुस्लिम धर्माप्रमाणे लागतात. वऱ्याच भटक्या जमातीत वालविवाह आजही होतात. गोपाळ, फिरस्ते कोळी, अशा जमातीत वालविवाहच आहेत.

काही विचित्र गोष्टीही पाहावयास मिळतात. कैकाडी पुरुष आपली पत्नी विकू शकतो. वऱ्याच गोसावी वधूवरांना लग्नाच्या वेळी नवीन कपडे विकत घ्यायला जमत नाही, ते वाजारातून दुसऱ्यांनी वापरलेले जुने कपडे आणून लग्न लावतात. वऱ्याच भटक्यांमध्ये हुंडा पद्धती नाही. घिसाडी जमातीतील मुलाने हुंडा मागितल्यास जातीतील तरुण मुले त्याच्यावर टीका करतात. 'तुझ्या हातात तुला लागेल ते मिळविण्याचा दम आहे की नाही? मुलीकडे वस्तू मागणारा हिजडा!'– अशा शब्दात हुंडा मागणाऱ्या मुलाला हिणवले जाते. घिसाडी जमातीपासून शहरी सुधारक, सुशिक्षितांनी हा धडा घ्यावा!

(भटक्यांचे लग्न : उत्तम कांवळे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. तीस रुपये)



अनुक्रमणिका

# नाच ग घुमा : माधवी देसाई

## दुखावलेल्या अहंचा रुष्ट थयथयाट

सुशील पगारिया

'नाच ग घुमा' हे श्रीमती माधवी देसाई यांचे आत्मचरित्र वाचताना किती तरी वेळा मन हेलावले. 'नाच ग घुमा' हे बाईंचे आत्मचरित्र–म्हटले तर पुरे म्हटले तर अपुरे! बाईंना आठव आहे तो ताईआजीच्या सहवासाचा, आणि आईच्या फोटोद्वारे ओळखीचा! त्या अगोदरची त्यांची हकीगत सांगीवांगी–नंतर कळलेली; त्याची नोंद नाही. अशीच आणखीही कितीतरी ठिकाणी हव्या त्या जागी पुष्कळसे रेंगाळणे व नको त्या ठिकाणी उडत स्पर्श करीत पुढे जाणे. हकीगत बालपणापासूनची असली तरी, मुख्य भर आहे सुप्रसिद्ध लोकप्रिय लेखक रणजित देसाईंशी झालेले लग्न, रुजलेले लग्न आणि भंगलेले लग्न याच्यावरच. एकाला तीन व एकाला दोन अशी जाण आलेली अपत्ये असतानाचे हे लग्न. अशा वेळी आप्त-स्वकीय या लग्नाबद्दल साशंक असले तर नवल नव्हे. या दोघांनी मात्र मोठ्या हिरीरीने, प्रयासाने व प्रबळ आत्मविश्वासाने मांडलेला हा डाव, तिथे पदोपदी येणारे अडथळे, अडचणी, द्वेषविद्वेषाच्या ज्वाळा हे सारे गृहीत धरूनच मांडलेला होता. एकाकी पुरुष व एकाकी स्त्रीचे एकाकीपण संपलेही होते. डाव रंगला तशी दोघेही थोडी बेसावध झाली. रंगलेल्या डावाला आटीव दुधाचे स्वरूप येते न् येते तोच कुठूनसा कसा मिठाचा खडा त्यात पडतो आणि बघता बघता दूध पार नासून जाते. त्या उभयतांवर प्रेम करणारे असंख्य लोक कळवळले; पुन्हा पुन्हा मनात यायला लागले की– 'असे व्हायला नको होते!' एकमेकांच्या आधाराची पकड जेव्हा सैलावत गेली, मनाला खिंडारे पडत गेली तेव्हा केवळ विश्वास धरून बसायचे एवढा तो काळ दुर्लक्षणीय असा खासच नव्हता.

इतक्या उशिरा आयुष्याच्या वाटेवर रुळल्यावर असलेल्या सवयी किंवा स्वभाव सहजी बदलणे शक्यच नव्हते.

बाईंची धाकटी लेक जिला आईपणाशी गरज असलेली, तिच्याकडे व देसाईंच्या सहवासाकडे होणारी बाईंची कुतरओढही स्वाभाविक होती.

–बाईंनी अडचणी, संकटे काढली असली तरी त्या पतिसहवासात होत्या. आणि तितकीच नव्हे त्याहूनही अधिक वर्षे देसाईंनी मनोरुग्ण पत्नी असल्यामुळे पत्नीशिवाय काढलेली होती.



अनुक्रमणिका

–इनामदारांना वाकडी वाट सहज शक्य असताना त्यांनी वाड्याचे चारित्र्य जपले होते.

–आयुष्याकडे बघण्याचा–, बाईंच्याच शब्दांत–इनामदारी दृष्टिकोण आणि मध्यमवर्गीय दृष्टिकोण भिन्न होते.

आणि दोघांनीच हिरीरीने मांडलेला डाव उधळताना मात्र बाकीच्या नातेवाईकांना ढवळाढवळ करण्याचे कारण नव्हते. गुंता दोघांनीच उकलायचा होता.

इतक्या उशिरा वठलेल्या वयात एकमेकांचे व्यक्तिमत्त्व समरस होणे जरी कठीण असले तरी सामाजिक, आर्थिक अन् मानसिक स्थैर्य लाभल्यानंतर बाईंच्या कलावती बुद्धिमती वक्तृत्वशालिनी अस्तित्व उभारण्याच्या नादात रणजित देसाई अधिक अधिक एकाकी व्हायला लागले. सुख वाळूसारखे हातून निसटायला लागले. आणि बाई केवळ विश्वासून निश्वासत, तेवढ्यापुरती खंत करीत राहिल्या. आणि आपल्या कर्तृत्वाची 'नाच ग घुमा' करीत राहिल्या. त्यांनी आपली कहाणी प्रांजळपणे मांडून यशापयशाची उत्तरेही त्यात देऊन टाकली आहेत. माधवीताई आपल्या मनोगतात म्हणतात–

'सत्य घटना लिहिताना कोणाची बदनामी करावी असा मुळीच हेतू नसतो. जे घडले ते सकृत्दर्शनी विकृत चमत्कारिक असले तरी नकळत आपणही त्यात गोवलेलो असतो. त्यामुळे फक्त इतरांना दोषी ठरवावे असे मला वाटत नाही. ज्याच्यावर मनोभावे प्रेम केले त्याला बदनाम करावे अशी माझी धारणा नाही. आम्ही स्त्रिया मुळातच दुबळ्या असतो. चुकणे अपरिहार्य असते!'

हे जर खरे तर हा लेखन-प्रपंच कशासाठी?

या आत्मकथनातली सगळी दुःखे सच्ची प्रांजळ असली तरी नाट्यमय आणि कलात्मक करण्याच्या नादात, 'स्वामी' आणि इतर पुस्तकातले उतारे पुनःपुन्हा घेऊन त्याला एखाद्या कल्पित कादंबरीचे रूप कशासाठी दिले आहे? निदान तसा वास येतोच. बाईंचे दुःख हिमनगासारखे एक अष्टमांश वर दिसते तसेच देसाईंचेही मूक दुःख आपली बाजू न मांडताही जाणवत रहाते.

–इतरांनी या दोघांच्या जीवनावर असलेल्या अधिकाराचा केलेला प्रेस्टिज् पॉइंट दोघांच्या दुखावलेल्या अहंच्या पसाऱ्यातून आणि अजूनही एकमेकांवर प्रेम करणारी ही दोघे पुन्हा कुठल्या क्षणी एकत्र येतील?

---

**सौ. मालती देऊळगावकर**

---

बिनचेहऱ्याची पण कुंकवाची लालभडक व ठळक निशाणी बाळगणारी मुखपृष्ठावरील स्त्री ही 'नाच ग घुमा'ची किंवा निर्जीव कठपुतलीची आठवण

करून देते. मान, सन्मान किंवा स्वतंत्र अस्तित्व नाही तरीही ती यांत्रिकपणे सारे व्यवहार करत असते. रणजित देसाईंनी घटस्फोट दिला नसता तर हे आत्मचरित्र बाहेर आले असते की नाही ही शंकाच वाटते.

माधवी देसाई या भावनिक दृष्टीने नात्यात जास्त गुरफटत राहतात. बराच काळ लोटल्यानंतरही पोर्तुगीज पोलिसांची भावना तितक्याच उत्कटतेने जाणवते. रणजित देसाईंसारखा 'स्वामी 'कार आपणास स्वतःची स्वामिनी होण्यास स्वतः होऊन विचारतो त्यात या इतक्या ठरवतात की त्यांचे पिण्याचे वेड, पहिली वेडी होण्याचे कारण, त्यांच्यासमवेत वावरणारी मंडळी यांचा विचार जगाचा भलाबुरा अनुभव घेऊन परिपक्व वयातही त्या करू शकत नाहीत.

नरहर कुरुंदकरांनी रणजित देसाई यांना बजावले होते. 'तुम्ही लग्न करू नका. मैत्री ठेवा.'

माधवी देसाईंशी बोलताना ते म्हणाले होते, 'तुम्ही स्त्रिया कधी कधी भोळ्या असता, कधी कधी मूर्ख ! जे विकृत असतं त्याला तुम्ही कल्पनेत सुंदर रंगवता, पण कधी तरी सत्य समोर येतं त्यावेळी अशा भेदरता.'

'तुमचा नवरा तुम्हाला ओळखता आला नाही.'

'ते एकवेळ तुम्हाला सोडतील पण सवयी सोडणार नाहीत.'

चित्रमहर्षी भालजी पेंढारकरांची लेखिका ही मुलगी. स्वतःच्या तीन यशस्वी लग्नांचा दाखला देऊन ते म्हणतात— 'जे वासनेनं जवळ येतात, त्यांचा शेवट असाच होत असतो. कादंबरीतील चार वाक्यं वाचून प्रेम करणाऱ्या मुली तुम्ही अशाच रडणार.' मुलीला हा दोष देत असताना 'रणजितला भेट' असा सल्लाही भालजी देतात.

'स्वामी' मधील रमा–माधवचे प्रेम, त्यांचे काल्पनिक संवाद, सती जाण्याच्या प्रसंगाचे उदात्तीकरण हे सर्व लेखिकेला आदर्श प्रेमगाथेप्रमाणे वाटते. आत्मचरित्राची सुरुवातच सतीच्या प्रसंगाची आहे. काल्पनिक गोष्टी खऱ्या समजण्याचा लेखिकेचा अट्टाहास आहे. त्यामुळे जे 'दान' होते त्याला आपण 'सन्मान' समजलो असे तिला शेवटी कळून येते.

संसारातील नात्यांच्या विविध भूमिका करताना स्त्रीचा 'नाच ग घुमा' चालू असतो. कधी समजून, कधी तडजोड म्हणून, कधी सवयीमुळे तर कधी यांत्रिकपणे ही विविध नाती जोपासताना स्वत्व मात्र फेकले जाते. क्वचित या साऱ्या नात्यांच्या कठपुतल्या फेकून देण्याची उर्मी दाटून येते. संस्कार, रूढी, परंपरा, समाज, नाती, बंधनं, संस्कृती या सर्व कारणामुळे ती घेर धरून नाचत राहते— सर्वांच्या तालावर. यातून स्वतःचा ताल शोधून बाहेर पडण्याचे एखादीलाच जमते. बाकीच्या त्या रिंगणातच संपून जातात. आत्मचरित्रात अनेकदा ध्रुपदासारखा 'नाच ग घुमा 'चा संदर्भ येत राहतो.

लेखिकेचे बालपण तसे दडपणातच गेले. विशिष्ट अंतरावरून आईवडिलांचे प्रेम मिळाले. शिक्षणासाठी 'तपोवनात' राहावे लागले. जुन्या काळाप्रमाणे वडिलांशी मोकळेपणाने बोलणे नव्हतेच, धाक व दराराच वाटे. आईचे प्रेमही त्याच जातीचे. मनात कुढणे, घुमेपणाने वागणे असे बालपण गेले. लग्नानंतर याच वडिलांनी भरभरून प्रेम दिल्याचा उल्लेख आहे. अशा या बालपणामुळेच नको एवढा हळुवारपणा, आदर्श प्रेमामागे धावणे या प्रवृत्ती लेखिकेच्या स्वभावात आल्या असाव्यात. 'ज्यावेळी फुलायला हवं तेव्हा फुलता आलं नाही' असे लेखिकेला वाटत राहिले. पुढे लेखिकेच्या मुलींचेही वडील लवकर गेल्यामुळे व आईने दुसरे लग्न केल्यामुळे अशीच घुसमट झाली असावी.

गोव्यातील देवदासींचे जवळून पाहिलेले जीवन, लग्न अशक्य म्हणून घरवाला शोधण्याचा आटापिटा, त्यांच्यावरील निष्ठा, गोव्याची दाची, मरत्या ही व्यक्तिचित्रं आठवणीत राहतात.

पहिला पती नरेंद्र काटकर स्वच्छतेचा भोक्ता. टापटिपीने राहणारा. मुलींना व्यवस्थित ठेवू पाहणारा व बायकोसाठी नोकरी पत्करणारा. माधवीने नोकरी घरताच या गोष्टीकडे, स्वयंपाकाकडे दुर्लक्ष होते म्हणून तो वियरतो. या ताणामुळे नोकरी करणाऱ्या स्त्रिया म्हणजे 'मंगळसूत्राच्या वेढण्यावर स्वेच्छेने आणखी एक वेढा चढवून घेणाऱ्या आहेत' असे लेखिकेस वाटते. काटकरला लॉटरीचा छंद आहे. थोड्या प्रमाणात रेसचा व मद्यपानाचाही नाद आहे. त्यामुळेच त्याच्या मृत्यूनंतर रणजितशी मैत्री होते, तेव्हा ते 'रमजित' आहेत हे कळूनही ती त्याकडे दुर्लक्ष करते.

काटकरच्या मृत्यूनंतर लेखिकेला पेइंग गेस्ट ठेवून घ्यावे लागले. डबे पोचवावे लागले. शेजारणींच्या चांभार चौकशास तोंड द्यावे लागले. विधवा स्त्री एकटी जिद्दीने जगते म्हटल्यानंतर 'खडे' टाकून पहाणारे व अफवा पसरवणारे अनेक हितचिंतक असतात. सासरकडून हक्काची वाटणी मिळावी असे लेखिकेला वाटते व त्या संदर्भात भालजी 'रणजितला भेट' असा सल्ला देतात. रणजितला भेटण्यासाठी बेळगावच्या विमानतळावर जाताना; त्यांची बायको वेडी झाली आहे हे सूचकतेने लता मंगेशकरनी सूचित केलेले असते.

या प्रथम भेटीनंतर 'कल्याणी, चित्ररेखा, सुगंधा, बसंती' अशा किती तरी संबोधनांनी रणजित पत्र लिहायचे. पत्रातील अनेक वाक्ये लेखिकेने उद्धृत केली आहेत. पण स्वतःची पत्रे, त्यातली वाक्ये मात्र मनातच ठेवली आहेत. टिटवाळ्याच्या गणपतीला नेऊन रणजितनी माधवीस कुंकू लावले. ती विरोध करत नाही. गोव्यातील वाटणीचा मूळ प्रश्न बाजूलाच राहतो. लग्नाचेच बंधन पडते. माधवीला न विचारता भालजी, वगैरेंना व मुलींना लग्नाचे सांगितले जाते तेव्हाच माधवीने आक्षेप घेऊन विचार करायला, स्वभाव ओळखायला हवा होता.

रणजितच्या दोन्ही मुलींनी ( वय १६ ते १८ ) 'तुम्ही दादांशी लग्न करा पण मूल होऊ देऊ नका' असा पोक्त सल्ला माधवीला-आपल्या होणाऱ्या आईस दिला. तेव्हाही या मुली मनापासून आपला स्वीकार करणार नाहीत अशी शंकेची पाल लेखिकेच्या मनात चुकचुकली नाही. कारण रणजित देसाईंच्या सुरेख शब्दांच्या इंद्रधनुष्याला भावूक मन लोभावलं अशी कबुली ( पान १६८ ) लेखिका देते. शब्दांची जादू, आर्जवे, उत्कटता याची भूल पडली. स्नेहाची, सुरक्षिततेची, भावनेची व बुद्धीची भूकही होती. ( आणि शरीराचीही ) आपल्या डोळ्यासमोर नव्या आईशी सलगी पहाताच रणजितची थोरली मुलगी म्हणते, 'समोर लग्नाच्या मुली बसल्यात ते तरी बघा.' या मुलींनी माधवीचे घरातील अस्तित्व मनापासून कधीच स्वीकारले नाही.

मद्यपान करीत असले तरी रणजित देसाई चारित्र्यवान आहेत याचा लेखिकेला अभिमान वाटे. ( पान १७८ ) माधवी येताच मावशी निघून जाते, त्याचे रणजितना मनस्वी दुःख होते. आपले नातलग स्वार्थी आहेत असे रणजित माधवीस सूचना देत. पण नातलगांसमोर माधवीची बाजू कधीच घेत नसत. उलट तिच्या-विरुद्धची कुजबूज निमूटपणे ऐकून घेत. रणजित देसाईंच्या दुभंग व्यक्तिमत्त्वामुळे हे घडत असावे असे लेखिका म्हणते. तिच्या नव्या योजनांना ते प्रोत्साहन देते पण तिला पूर्व जीवनातील आठवणी आल्या की तिला एकदम झटकून टाकत. 'ते कधी कधी एकदम प्रेमळ तर कधी कमालीचे हिंस्त्र होत' ( पान १८३ ) या दोन टोकाच्या भूमिकेशी जमवून घेणे लेखिकेस कठीण गेले. याखेरीज इनाम-दारांच्या घरातील- स्वतःची सासू व सवत यांच्यावरील अत्याचारामुळे 'स्वामी' कारांचा मुखवटा समजला असे ती सांगते.

छोटया गीतूमुळे दोघाचे वाद होत. कदाचित हेच दुःख शंकरला सांगून रणजित त्याची सहानुभूती मिळवित असावेत. माधवी पूर्णपणे आपली होऊ शकत नाही, गीतूबद्दल स्वतःच्या मुलीइतके ममत्व वाटत नाही असे ते मानतात. माधवी लेखिका व वक्ता म्हणून आपल्यापेक्षा जास्त लोकप्रिय होईल म्हणूनही किंतु असावा. मुली, जावई, इतर नातेवाईक त्यात भर टाकतात. त्यामुळे दुरावा वाढत जातो. गोवेकरीण म्हणजे चेटुक करणारी असा रणजितच्या नातेवाइकांचा समज माधवीला दूर केले तर प्रचंड इस्टेटीतील धोंड कायमची दूर होईल ही जवळच्या वारसदारांची भावना. दिलखुलास बोलून गैरसमज दूर होण्याऐवजी एकावर एक गैरसमजांची फुटे चढतच गेली. त्यातच 'दुरपदानं' घेतलेली फाशी रणजितला हलवत नव्हती. कमळीचा नवरा ट्रक अपघातात वारल्यानंतर 'चार दिवसांनी गाव तिची काळजी घेईल' हे रणजितचे उत्तर ऐकून कादंबरीतील त्याच्या स्त्री दाक्षिण्याच्या वर्णनाला तडा जातो.

घर कलात्मक सजवूनही लेखिकेच्या मनात 'अभोगी' कायम घर करत

होती. तरीही घटस्फोट न घेण्याविषयी तिने एवढी विनवणी का करावी ते समजत नाही. केवळ समाजासाठी पती पत्नी म्हणून एकत्र राहायचे ? पहिल्या पत्नीस रणजित वेताने झाम झाम मारायचे. ( पा. २०१ ) लेखिकेवर हा प्रयोग झाला नाही. रणजितच्या पहिल्या पत्नीने—सुनंदाने रॉकेल घेतले, झोपेच्या गोळ्या घेतल्या, स्वतःला जाळून घेतले, अंगावरची वस्त्रे फाडली. का ? इत्यादी प्रश्नांची उत्तरे लेखिकेला कधीच मिळाली नाहीत.

सुनंदाचा फोटो लावणे, तिला जाऊन भेटणे, तिच्या जेवणाची कपड्याची काळजी घेणे, तिची तेथून सुटका करणे व तिचा संपूर्ण विश्वास संपादन करणे हे लेखिकेचे कृत्य तिच्या विशाल मनाचे दर्शन घडवते.

मुलींच्या शिक्षणासाठी माधवीने वेळगावला घर करणे रणजितला आवडले नाही. वरून ते शांत असले तरी ती वादळापूर्वीची शांतता होती. 'नवऱ्याची देखभाल न करता ती वेळगावी राहते' याचे उट्टे ते कसे काढतात ? शिक्षण संपवून माधवी कोवाडला येताच तिला न सांगता ते परगावी जावून राहतात.

यशवंतराव चव्हाणांपासून सारे माधवीला कडक वागण्यास सांगतात. 'माधवीचा शब्द मोडणार नाही' असे वचन रणजितकडून घेतात. पण संस्कार केंद्र, रणजित-नगर, माधवीच्या महिला मंडळ इ. विधायक कार्यामुळे रणजित दुखावतात. रणजित नगरच्या उदघाटनाच्या वेळच्या माधवीचे भाषण झाले त्या रात्री रणजित म्हणतात, 'माधवी, फार सुरेख वोललीस. पण आता द्वेपाला आमंत्रण दिलं आहेस तुला फार त्रास सोसावा लागेल.'

यशू नवऱ्यास सोडून येते तेव्हा आईला म्हणते, 'ज्या पुरुषावर प्रेम करायचे तो पुरुष त्या प्रेमाला, त्या त्यागाला पात्र हवा ना ? वापरणारा व वाकवणारा पुरुष केवळ कुंकवाचा धनी म्हणून स्वीकारायचा का ?' माधवी असे म्हणू शकत नाही. स्त्रीचे स्वतंत्र अस्तित्व, लिहिणे, बोलणे, समाजसेवा करणे हे रणजित देसाईंना नको असावे. ते संस्कार केंद्राच्या मुलादेखत जीवे मारण्याची धमकी देतात. ( पान २९२ ) प्रेम लाभूनही दोघे अभोगी राहिलो असे लेखिकेला वाटते. पण ते प्रेमच होते का ? स्वतःला केंद्र समजून स्वतःभोवती सारखे इतरांना फिरायला लावणारी अहंकेंद्रित व्यक्ती कधी कोणावर जीव टाकून प्रेम करू शकते का ?

अनेक पात्रांचा व लेखकांचा उल्लेख मुद्दाम लेखिका स्वसमर्थनार्थ करते. ती पात्रे कथनाच्या ओघात येत नाहीत. काही ठिकाणी आत्मस्तुतीही जाणवते. वैधव्य आल्यावर पुनर्विवाह केल्याने कोणत्या समस्या निर्माण होतात याचे विश्लेषणही यात आलेले आहे. प्रतिष्ठित पुरुषही कसा दुटप्पी वागतो, घरचे व बाहेरचे वर्तन यात कसा विसंगत असतो याचे दर्शन हे आत्मकथन घडवते.

( नाच ग घुमा : माधवी देसाई, चंद्रकला प्रकाशन, पुणे, नव्वद रुपये )



अनुक्रमणिका

# अमुकचं स्वातंत्र्य : शशांक ओक

## निरर्थकवादी तरुण नायकाचं आत्मकथन

–डॉ. वि. स. जोग

'अमुक' चे स्वातंत्र्य हे २४२ पानांचे पुस्तक म्हणजे अलीकडच्या काळात मी वाचलेला एक लक्षणीय ग्रंथ. अलिकडे कथा कादंबऱ्या वाचण्यात मन रमत नाही. आत्मचरित्रे वाचावीशी वाटतात. आत्मनिवेदनात्मक लेखन मग ते एखाद्या साहित्यिकाचे केवळ साहित्यनिर्मितीबद्दलचे असो, एखाद्या क्रिकेटपटूचे क्रिकेट जीवनातील आठवणी सांगणारे असो, एखाद्या निवृत्त राजकारणी समाजकारण्याचे जुना काल उभा करणारे असो, पण असं काही अस्सल, थेट सांगणारं असेल तर ते वाचावसं वाटतं.

याचं एक कारण जग इतकं व्यामिश्र झालं आहे की ते एका सरळ रेषेत कोणी उलगडून दाखवलं तर तेवढ्यापुरतं वरं वाटतं. याचं दुसरं कारण दूरदर्शनादी माध्यमामुळे जग इतकं बंद झालं आहे की ते असं आत्मनिवेदनाच्या माध्यमातून कोणीही उकलून दाखवलं तरी वरं वाटतं. याचं तिसरं महत्त्वाचं कारण कविता सोडली तर मराठी साहित्यात कथा कादंबऱ्यांचं जग इतकं कृत्रिम, इतकं बायकी आणि इतकं निस्तेज झालं आहे किंवा दूरदर्शनच्या स्पर्धेत ते इतकं निस्तेज दिसतं तरी आहे की त्याकडे वाचकमन मुळी आकर्षितच होत नाही.

अमुकचे 'स्वातंत्र्य' हे आत्मनिवेदनात्मक पुस्तक आहे. तांत्रिक दृष्टीनं याला आत्मचरित्र कदाचित पूर्णपणे म्हणता येणार नाही. कारण यातली काही पात्रं, नावं काल्पनिक भासतात. अर्थात पात्रं, नामं काल्पनिक भासत असली तरी अनुभव आणि अनुभवांवरच्या लेखकाच्या प्रतिक्रिया वास्तव आहेत.

हे पुस्तक पाच भागात आहे. यात एका आधुनिक मध्यमवर्गातील तरुणाचं शालेय जीवनापासून पहिली शिकाऊ नोकरी लागण्यापर्यंतच आयुष्य आलं आहे. परिसर पुण्याचा आहे. साधारणपणे तीसपस्तीस वर्षांपर्यंतचं एका विशिष्ट चाकोरीतलं मध्यमवर्गीय जग या पुस्तकात अवतीर्ण झालं आहे.

मुक्तिबोध ज्याला आशय–आकृतीची एकात्मता म्हणायचे ती या पुस्तकात दिसते. म्हणजे असं की पुरेशी विद्या, पुरेसं वित्त, पुरेसे संस्कार लाभलेल्या मध्यमवर्गातल्या बालकिशोर तरुण मनाचे विचार जसे असावेत तसे येथे आहेत. ज्या पद्धतीनं व्यक्त व्हायला हवेत त्याच पद्धतीनं ते व्यक्त झाले आहे. अनन्यसाधारण

शैली, ज्या शैलीनं माझ्या माहितीतल्या एकाही लेखकाचं अनुकरण केलं नाही, आदर्शही ठेवला नाही,– अशी अत्यंत मनोज्ञ शैली हे या पुस्तकाचं मुख्य वैशिष्टय असं मला वाटतं.

आजच्या मध्यमवर्गातला गोंधळलेला आणि भरकटलेला तरुण या पुस्तकाचा नायक आहे. या गोंधळण्याची आणि भरकटण्याची अनेक कारणे आहेत. एकतर बालपणापासूनच भित्रेपणाचा एक गंड या नायकाच्या ठिकाणी आहे. बालवयात तो बुजरा. पण त्याचा बुजरेपणा ज्यांनी पद्धतशीर घालवायला पाहिजे ते आई-वडील दोघंही नोकरीत गुंतलेले. या गुंतलेल्या गृहिणीला आणि पुरुषाला कोणतंही ध्येय नाही. त्यामुळं यांनी आपल्या पिलाला दाणापाण्याची चारापाण्याची व्यवस्था केली. पण उडायला शिकवलं नाही. म्हणून नायक शेवटपर्यंत उडालाच नाही. एक तर त्याला महत्त्वाकांक्षेचे पंख फुटले नाहीत. दुसरी गोष्ट नुसते महत्त्वाकांक्षेचे पंख फुटूनही आकाशात उंचपर्यंत उड्डाण घेता येतं असं नाही. तसं उड्डाण घेण्यासाठी आत्मभान जागृत करणारी परिस्थिती संपर्कात किंवा संघर्षात यावी लागते. व्यक्ती अशा संपर्कात आणि संघर्षात याव्या लागतात. त्या तशा आपल्या नायकाच्या सहवासात आल्या नाहीत. तशा घटना घडल्या. आणीबाणी आली. संघवाले आहेत. कम्युनिस्ट आहेत. समाजवादी आहेत. पण या लेखकाचा गोंधळ दूर करण्यात, अस्तित्ववादी समाधानाचं जबरदस्त परिवर्तनवादी ध्येयवादात रूपांतर करण्यात कोणीही यशस्वी झालं नाही. आजच्या समाजजीवनाची ही एक शोकांतिका आहे. परिवर्तनवादी आणि ध्येयवादी लोक निश्चितपणे आज टिळक, सावरकर, आंबेडकर यांच्या तोडीचे नाहीत. अगदी राजकारणाचं क्षेत्र पाहिलं तरी राजीव गांधी किंवा विश्वनाथ प्रसाद सिंह यांच्यात जी झुंज झाली ती दोन कमजोर पहेलवानांची कंटाळवाणी झुंज आहे. आजही आपण पाहातो की पंजाबमध्ये जाहीरपणे बंदुका घेऊन लढणारे आणि आपल्या शस्त्रसंग्रहासाठी जाहीरपणे पैसा मागणारे दोन कम्युनिस्ट पक्ष सोडले तर 'पंजाब' प्रश्नानंही आपणाला काही घुसळून काढलेलं नाही. मग अशा परिस्थितीत 'अमुकचं स्वातंत्र्य' या लेखकाच्या नायकासारखे निरर्थकवादी नायकच निर्माण झाले तर त्यात आश्चर्य कसलं. आणि आजच्या मध्यमवर्गातील–निदान काही एका मध्यमवर्गातील–तरुणाचं निरर्थक व्यक्तिमत्त्व या पुस्तकात लेखकानं धिटाईनं मांडलं आहे.

(अमुकचं स्वातंत्र्य : शशांक ओक; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, साठ रुपये)

---

- **पुनश्च श्रीकरपंत** – रा. म्हा. बाबमारे, ॐकार, २३ परशुरामनगर, सयाजीगंज, बडोदे, पृ. १५८, रु. ४०.
- **पाच बुद्धिवंत** – हनुमंत गवळी, प्रेरणा प्रकाशन, बहिरोबा नाला, सोलापूर रोड, स. नं. १६, पुणे १३, पृ. ८२, १५ रु., १९८८.

---

# देवदासी आणि नग्नपूजा : कांबळे

## मन सुन्न करून सोडणारे पुस्तक

सौ. मंगला दंडगे

इंग्रजांची जुलमी राजसत्ता दूर करता आली. पण भारतीयांच्या मानगुटीवर वसलेले अंधश्रद्धेचे भूत अजून जात नाही. ते घालविण्यास किती काळ लागेल कोणास ठाऊक ! देवदासीचे जीवन दारिद्र्यापोटी पत्करलेले कधी असहायतेने, कधी अंधश्रद्धेने. देवा–धर्माच्या नावावर चाललेला हा वेडाचार आणि त्याला 'मुकी विचारी कुणी हांका' या उक्तीप्रमाणे परंपरेची ढांपणे लावून चाललेला अज्ञानी समाजाचा प्रचंड लोंढा ! प्रचंड प्रवाहाविरुद्ध आवाज उठवणारे मूठभर पत्रकार, छोटया छोटया संघटना प्रत्यक्ष विरोधाच्या वेळी होणारी दमछाक, प्रेक्षक पोलिसाची अनास्था सारे तपशील डोके भणभणायला लावणारे ! मन सुन्न करून सोडणारे ! आमदार–खासदार, मंत्री यांची या प्रश्नाबद्दलची उदासीनता. देवदासींची प्रथा इतिहास त्याबद्दल चालू असलेले प्रयत्न, कणभर का होईना मिळत चाललेले यश, सर्व गोष्टींचा उहापोह लेखकाने केला आहे. चंद्रगुत्तीला होणारी नग्नपूजा आणि त्या विरुद्धचे वादळ अंगावर शहारे आणणारे आहे.

देवदासींना 'सावली' देणारी 'सावली' संघटना तिचे काम उल्लेखनीय आहे. समाजातील अज्ञान दूर होईल तेव्हा अंधश्रद्धेची बीजे नष्ट होतील. त्वचेचे रोग अस्वच्छतेने होतात का यल्लमाच्या कोपामुळे ? संपत्ती–संतती–समृद्धी ही सुखे नग्नपूजेमुळे मिळाली असती तर इतकी वर्षे चाललेल्या या 'पुण्याई'मुळे निदान कर्नाटकात पूजा करणारी प्रजा तरी सुखी झाली आहे काय ? सगळे प्रश्न अनुत्तरित रहातात. यल्लमाच्या कृपेमुळे समस्या दूर झालेल्या नाहीत. होणारही नाहीत. लहान वयात श्री. उत्तम कांबळे यांनी समाजातील अनिष्ट प्रथेला, परंपरेला धक्का देण्याचं धाडस केले आहे. प्रवाहाविरुद्ध पोहताना झालेली दमछाक सहन केली आहे. श्राद्ध हे त्यांचे पुस्तक दलित समाजातील दोष दिग्दर्शन करते. त्यांची लेखनाची बैठक, समाजातील अनिष्ट प्रथांविरुद्ध कडाडून लिहिण्याची आहे.

( देवदासी आणि नग्नपूजा : उत्तम कांबळे, मेहता पब्लिसिंग हाऊस, पुणे, तीस रुपये )



अनुक्रमणिका






# ग्रामीण साहित्य-एक चिंतन : भोसले

## आंतरिक जिव्हाळा व अंगभूत आपलेपण

प्रा. वसंत केशव पाटील

गेल्या पंधरा–वीस वर्षांमध्ये ग्रामीण कथा–कादंबरी, काव्य इ. बरोबर ग्रामीण समीक्षा देखील बऱ्यापैकी बाळसे धरू लागली आहे. खरे पाहाता, सांप्रतचा काळ ग्रामीण साहित्याच्या भरघोस सुगीचा हंगाम म्हणावा लागेल, असेच वारे आहे.

कोणतीही चांगली समीक्षा कसदार साहित्यनिर्मितीला प्रेरक, पोषक नी आश्वासक ठरते. परंतु ग्रामीण साहित्याच्या संदर्भात मात्र प्रस्थापितांच्या संकोची समीक्षेने एक तर तिरकस शेरेबाजी किंवा पूर्णत्वाने अनुल्लेख ह्याशिवाय अन्य काही केले नाही. परिणामी, ग्रामीण साहित्याला एका सहृदय, डोळस नी निष्पक्ष समीक्षेची पाठराखण न लाभल्याने त्यामध्ये अनेक ठिकाणी साचलेपण, तीच ती किस्सेदार कथांची कंटाळवाणी आवर्तने, ज्येष्ठांचे आंधळे व रोमँटिक अनुकरण आणि नको तेवढी शैलीशरणता इ. चे प्रमाण अधिक दिसते. ह्या गतिस्थितीला व्यापक व समजूतदार दृष्टीच्या समीक्षेचा अभाव हेच मुख्य कारण आहे, हे ध्यानात घेऊन काही सृजनशील ग्रामीण साहित्यिकांनी समीक्षात्मक लेखनाकडे विशेष जाणीवपूर्वक आपला मोर्चा वळविला. त्यात डॉ. आनंद यादव यांच्या बरोबरीने प्रा. द. ता. भोसले, प्रा. नागनाथ कोत्तापल्ले प्रभृतींचा सहभाग उल्लेखनीय आहे. 'ग्रामीण साहित्य : एक चिंतन हे' पुस्तक उपरोक्त दिशेने केलेला एक भरीव प्रयत्न आहे. प्रा. द. ता. भोसले यांची ही समीक्षा म्हणूनच अगत्यपूर्वक नोंदवावी अशी आहे.

प्रा. भोसले हे ग्रामीण कथाकादंबरीच्या प्रांतात सध्याच्या आघाडीच्या फळीत घेतले जाणारे नाव आहे. त्यांनी चांगले विनोदी लेखनही केले आहे. प्रा. भोसले यांचे सदर पुस्तक मात्र समीक्षाविषयक आहे. ह्यात एकूण बारा लेख असून ते वेळोवेळी नामवंत नियतकालिकांत येऊन गेले आहेत. प्रा. भोसले हे स्वतः सृजनशील ग्रामीण लेखक आहेत त्यामुळे त्यांच्या समीक्षा–दृष्टीत ग्रामीणतेविषयी उपजतच आंतरिक जिव्हाळा व अंगभूत आपुलेपण आहे. 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी' ह्या वचनाला शोभणारे असे हे लेखन आहे. त्यात एक समंजसपणा, समजूतदार वृत्ती नी व्यासंगी सखोलता आपोआपच आलेली आहे. ग्रामीण साहित्याचे प्रयोजन, त्याचे वेगळेपण, पिंड–धर्म, त्यातील प्रादेशिकता व

सामाजिकतेचे सम्यक स्थान इ. महत्त्वाच्या पैलूंचा प्रा. भोसल्यांनी विस्तारपूर्वक उहापोह केला आहे. सोबत ग्रामीण अभिरुचीचा आलेखही मांडला आहे व अप्रत्यक्षपणे नवोदित ग्रामीण लेखकाला काय व कसे लिहावे, याविषयीची जाणीव करून दिली आहे. प्रासंगिक लोकप्रिय लेखन आणि उत्तम दर्जेदार सृजन ह्यांतील सीमारेषांचे आकलन झाल्याखेरीज लेखकही सृजनाराधनेकडे गांभीर्याने वळत नाही. हे कठोर सत्य आहे. ह्या संदर्भात प्रा. भोसल्यांचे विवेचन–विश्लेषण मोलाचे ठरावे.

ग्रामीण व दलित साहित्यातील नातेसंबंध, त्यांचा विरोध–विकास तसेच त्यांच्यातील व्यापक सामाजिक जाणिवांचा नी प्रेरणांचा मागोवाही लेखकाने सावधपणे घेतला आहे. त्यात भावविवशता, भावडेपणा किंवा कुठला पक्षपात नाही. 'ग्रामीण साहित्य व निसर्ग' हा लेख लेखकाच्या अनुभव–आविष्कार पद्धतीवर प्रकाश टाकणारा वाटतो. 'सांस्कृतिक चळवळी व शासन' या लेखात प्रा. भोसल्यांनी शासनाच्या समाजोन्मुख व सांस्कृतिक प्रबोधनाच्या भूमिकेची आठवण करून दिली आहे. ( पण, लक्षात कोण घेतो ! )

ह्या पुस्तकात काही गोष्टी खटकतात, त्यांची संक्षिप्त नोंद अशी– १) 'आजच्या ग्रामीण लेखकांपुढील आव्हाने' व 'ग्रामीण लेखकांपुढील काही समस्या' ह्या दोन स्वतंत्र शीर्षकांखाली एकच मजकूर आहे. २) धनगरी ओव्या व शाहिरी कविता या विषयांवरील लेख विस्तृत व जाणकारीने लिहिले आहेत, हे खरे. तरीही पुस्तकाच्या एकूण आशयाशी तसे लांबून संबंधित म्हणून टाळायला हवे होते. ३) ग्रामीण काव्य, नाटक व समीक्षा इ. विषयी एखादा लेख पाहिजे होता. किमान ह्या क्षेत्रातील ग्रामीण दुष्काळाची काही कारणे शोधली असती, तरी चालले असते. ४) प्रा. भोसले हे सृजनशील शैलीदार लेखक आहेत, हे पूर्वीच उल्लेखिले आहे. त्यांच्या या शैलीदारपणाने त्यांच्यातील समीक्षकाच्या भाषेवर मात्र अन्याय केला आहे, असे वाटते. काही ठिकाणी मुद्द्यांची, शब्दांची मोहक फिरवाफिरव, विशेषणांची लांबण व प्रौढ गंभीर शैलीऐवजी एक बाळबोध वक्तृत्व-पूर्ण ढंग दिसून येतो. अर्थात ह्याचा एक लाभही आहे तो म्हणजे, समीक्षा म्हटली की ती जात्याच बोजड नी दुर्बोध असलीच ( किंवा लिहिलीच ) पाहिजे या प्रस्थापित मताला शह बसणार आहे. असो. 'नाविन्यत्व' ( पृ. ९ ) 'सौष्ठवता' ( पृ. १५ ) ह्यांसारखे चुकीचे शब्दप्रयोग मात्र अजिबात नको होते. ५) यादव, बोराडे, माडगूळकर अशासारखे ढोबळ उल्लेखही खटकतात. एक तर, त्यात नेमके-पणा नसल्याने एकदम नवख्या वाचकाची अडचण होते आणि स्वच्छ–सरळ आकलनात कणभर तरी उणेपणा राहतो. अर्थात प्रा. भोसल्यांच्या वक्तृत्वयुक्त शैलीचा तो एक सहज परिणाम–प्रभाव आहे.

सरतेशेवटी, ह्या पुस्तकाच्या बाबतीत दाद देण्यासारखी गोष्ट म्हणजे

चंद्रमोहन कुलकर्णींचे मुखपृष्ठ. ते साधे, आकर्षक आणि बोलके आहे. प्रतीकात्मक तर ते आहेच.

( ग्रामीण साहित्य : एक चिंतन : डॉ. द. ता. भोसले, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे १५५. ४५ रुपये )

---

# रंगनायक : अरविंद देशपांडे

## इतिहास, साहित्य व व्यक्तिचित्र—त्रिवेणी संगम

**डॉ. गं. वि. नेर्लेकर**

---

३ जानेवारी १९८७ ला अरविंद देशपांडे यांचे दुःखद निधन झाले. त्यांचे वर्षश्राद्ध आविष्कारच्या सहकारी कलावंतांनी आगळ्यावेगळ्या स्वरूपात केले. प्रस्तुत ग्रंथ हा त्यापैकीच एक भाग. नायक म्हणजे पुढे नेणारा नेता. अरविंद देशपांडे यांनी १९६० नंतरच्या काळात मराठी रंगभूमीला नवी कलाटणी देऊन तिच्यात नवचैतन्य निर्माण केले यात शंकाच नाही. कसलेला नट, उत्कृष्ट जाणकार दिग्दर्शक, प्रायोगिक रंगभूमीचा आधारस्तंभ, छबिलदास चळवळीचा कुशल संघटक व एक सच्चा दिलदार माणूस म्हणून त्यांची ओळख प्रस्तुत ग्रंथात वाचकाला निश्चित होईल. तरीही हा ग्रंथ म्हणजे चरित्रग्रंथ नव्हे. नुसता गौरवग्रंथही नव्हे तर त्यांच्या रंगभूमिविषयक कार्याचे यथार्थ मूल्यमापन करणारा हा स्मृतिग्रंथ आहे आविष्कार ह्या संस्थेनेच तो प्रकाशित करण्यात मोठे औचित्य साधले आहे. नाईक, तापस व मुळ्ये ह्या संपादक त्रयीने परिश्रमपूर्वक ह्या ग्रंथाचे संपादन केले आहे. इतिहास, साहित्य व व्यक्तिचरित्र समीक्षा ह्या दृष्टीने हा ग्रंथ आगळावेगळा म्हणूनच उल्लेखनीय वाटतो.

ह्या ग्रंथाची निर्मिती सामुदायिक स्वरूपाची आहे. आजचे युगच सहकाराचे आहे. रंगभूमीशी संबंधित म्हणून सुरवातीस नांदी व पूर्वरंग (प्रास्ताविक) आले आहेत. संपादकांनी ग्रंथ निर्मितीचा उद्देश स्पष्ट केला आहे. १ ल्या विभागात देशपांडे यांचें नातलग (निर्मला, सुलभा, साखरदांडे), मित्र, सहकारी (काकडे, सारंग, विजया मेहता, दोशी, पोतदार) शिष्य (पाटेकर, शफाअत खान) शिवाय साधना आमटे, सई परांजपे यांचे परिचयपर लेख आहेत. एक माणूस, मित्र, कलावंत म्हणून देशपांडे त्यांना कसे वाटले ते ह्या मित्रमंडळींनी मोकळेपणाने लिहिले आहे. त्यांचे प्रेम, रुसवे फुगवे, शिस्त, मित्रत्व, दिग्दर्शन यांची चांगलीच ओळख होते व मूल्यमापनही होते. ह्या विभागात भावनात्मक स्पर्श अधिक जाणवतो.

दुसऱ्या विभागात अरविंद देशपांडे यांचे नाट्यक्षेत्रातील कर्तृत्व व त्याचे यथार्थ मूल्यमापन व विश्लेषण नाट्यक्षेत्रातील जाणकारांनी केले आहे. पु. ल., मतकरी, तेंडुलकर, केंकरे, मोघे यांचे लेख मार्मिक म्हणावे लागतील. कमलाकर नाडकर्णी यांनी खरा दिग्दर्शक कसा जाणवतो ते सांगितले आहे. डॉ. श्रीराम लागू, सुधा करमरकर, दुबे यांचे छोटे लेखही खूप काही सांगणारे आहेत. ह्या सर्व लेखातून १९६० ते ८० ह्या काळातील प्रायोगिक व व्यावसायिक रंगभूमीचाही चांगला परिचय होतो.

तिसरा विभाग सैद्धांतिक स्वरूपाचा आहे. रंगभूमीच्या ज्या अंगांबद्दल अरविंद देशपांडे यांना आस्था होती, त्यांच्याशी संबद्ध असे लेखन हेमचंद्र अधिकारी, प्रा. पुष्पा भावे, शांता गोखले, माधव वझे व डॉ. गंगाधर पाटील यांनी केले आहे. रंगभूमीच्या अभ्यासकांना हे लेख खरोखरच मार्गदर्शक ठरावेत. प्रायोगिक रंगभूमी (प्रा. भावे) नाटक : स्वरूप–विचार (प्रा. गंगाधर पाटील) व्यावसायिक रंगभूमी (शांता गोखले) हे लेख अतिशय अभ्यासपूर्ण उतरले आहेत.

जीवनरेखा (देशपांडे यांचे आयुष्य), नाट्यरेखा (रंगभूमीवरील कर्तृत्व), चित्रपट–दूरदर्शन रेखा व देशपांडे यांचे स्फुटलेखन ही **चार परिशिष्टे ग्रंथाची परिपूर्तता करतात. ‘छबिलदास चळवळी’** संबंधीचा लेख सर्वार्थांनी परिपूर्ण आहे. ह्या ग्रंथात अशोक रानडे, ज्ञानेश्वर नाडकर्णी यांचे लेख आले असते तर दुधात साखर पडली असती. देशपांडे यांची रंगभूमीवरील अनेक छायाचित्रे ग्रंथाच्या सौंदर्यात भर घालणारी आहेत. उत्तम आयोजन, उत्कृष्ट प्रयोजन, सुरेख प्रकाशन व अभ्यासपूर्ण लेखन यामुळे ग्रंथ संग्राह्य ठरेल यात शंकाच नाही. श्री. अरविंद देशपांडे यांनी ‘दिग्दर्शन कलाकौशल्य शास्त्र’ यावर एक ग्रंथ लिहिला असता तर बरे झाले असते पण नियतीचा खेळ काही वेगळाच असतो !

---

# चंद्र चवथीचा : प्रा. म. वा. धोंड

## वृद्धत्वी निजयौवनास जपणे बाणा असे आमचा

**भालचंद्र गुजर**

---

१९८५ मध्ये राम गणेश गडकऱ्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने वृत्तपत्रांच्या पुरवण्यांतून तसेच मासिकातून व दिवाळी अंकातून त्यांच्या साहित्याची समीक्षा करणारे बरेचसे तात्कालिक व काही मूलगामी लेखन प्रसिद्ध झाले होते. प्रा. धोंड यांनी गडकऱ्यांच्या नाट्यप्रतिभेचा वेध घेणारे चार लेख लिहिले होते.

संशोधनात्मक दृष्टीची साक्षेपी जोड दिल्याने ते वेगळे ठरले. 'चंद्र चवथिचा', 'नाटकातील पात्रे', 'संगीत नाटक', 'नाटकातील विनोद', 'स्वत्वाचा शोध' व 'नाटचदृष्टी' यांनी हा ग्रंथ सिद्ध झाला आहे गडकऱ्यांच्या नाटचप्रतिभेसंबंधी नवा विचार मांडणाऱ्या या ग्रंथास यंदाचे 'रा. श्री. जोग पारितोषिक' प्राप्त झाले आहे.

प्रत्येक साहित्यिक आपल्याला कोणता साहित्यप्रकार भावतो— याचा शोध घेत असतोच ! आणि तो साहित्यप्रकार गवसल्यावर त्याच दिशेने परिपूर्णतेकडे त्याची वाटचाल सुरू होते. गडकरीही त्याला अपवाद नव्हते. १९०७ पासून गडकऱ्यांनी 'मनोरंजन' मासिकातून गोविंदाग्रज व बाळकराम या टोपणनावांनी अनुक्रमे काव्यलेखनाला व विनोदी लेखनाला आरंभ केला होता; तथापि काव्यापेक्षा व विनोदी लेखनापेक्षाही त्यांना नाटचलेखनाचेच जास्त आकर्षण होते. १९१२ मध्ये त्यांचे 'प्रेमसंन्यास' हे नाटक रंगभूमीवर आले आणि मग १९१२ ते १९१८ ह्या कालावधीत त्यांच्या नाटचप्रतिभेला भरती आली. काव्य आणि नाटचलेखनातील मर्यादित यशामुळे गडकरी नाटकाकडे वळले आणि त्यांना भावलेला साहित्यप्रकार गवसला— या घटनाक्रमाचे वर्णन चिंतामणराव कोल्हटकरांच्या 'बहुरुपी' या आत्मचरित्रातील दाखले देऊन प्रा. म. वा. धोंड यांनी केले आहे. 'स्वत्वाचा शोध' लागल्यावर गडकऱ्यांनी काव्यलेखनाकडे व विनोदी लेखनाकडे पाठ फिरवली व नाटचलेखनावरच लक्ष केंद्रित केले.

वयाच्या ३४ व्या वर्षी गडकऱ्यांचे अकाली निधन झाल्याने त्यांना लेखनासाठी फारसा काळ लाभला नाही आणि लेखनाच्या आरंभकाळात विनोदी लेखन व काव्यलेखन केल्याने नाटचलेखनासाठी फारच थोडी वर्षे लाभली. (१९१२ ते १९१८) या अल्पावधीत त्यांनी 'पुण्यप्रभाव', 'प्रेमसंन्यास', 'भावबंधन' व 'एकच प्याला' ही चार पूर्ण नाटके लिहिली व 'राजसंन्यास' मात्र अपूर्णच राहिले. या सर्वच नाटकांनी रंगभूमीवर अपार यश प्राप्त केले.

गडकऱ्यांचे 'राजसंन्यास' हा एक महान वाग्यज्ञ आहे. मराठी इतिहासाची, मराठी शौर्याची, मराठी संस्कृतीची आणि मराठी भाषेची ती अमर गाथा आहे. 'राजसंन्यास' मधील व्यक्तिरेखा, त्यांचे स्वभावरेखाटन, त्यांची भाषा, 'राजा हा जगाचा उपभोगशून्य स्वामी आहे' या तत्त्वानुसार त्यापैकी प्रत्येकाने केलेला आत्मयज्ञ आणि नाटकाच्या प्रत्येक प्रवेशाची मांडणी ह्या सर्वच गोष्टी कलासुंदर आहेत.

'नाटकातील पात्रे', 'नाटकातील विनोद' आणि 'संगीत नाटक' ह्या तीन लेखांतून प्रा. धोंड यांनी काही निरीक्षणे नोंदविली आहेत, काही प्रश्न उपस्थित केले आहेत. एवढेच नव्हे, तर त्या प्रश्नांची उकल करण्याचाही प्रयत्न केला आहे. गडकऱ्यांच्या नाटकातील नायकांच्या तुलनेत खलनायक अधिक प्रभावी वाटतात. 'भावबंधन' मधील घनश्याम तर नायकच वाटावा एवढा उठावदार आहे. 'एकच

प्याला ' या नाटकातील सुधाकराचा अपवाद वगळता, गडकऱ्यांचे एकूणच सर्व नायक मवाळ आहेत आणि नाटकातील नायिका व उपनायिकाही त्यांना निष्प्रभ करतात. ' भावबंधन ' मधील धुंडिराज व ' एकच प्याला ' तील गीता ही दुय्यम पात्रे बोलभांड आहेत खरी; पण त्यांच्या स्वभावातील प्रेमळपणा, मोकळेपणा व सरलता ह्यामुळे प्रेक्षकांना त्यांच्याबद्दल ममत्व वाटते. गडकऱ्यांच्या नाटकातील विनोदी व्यक्तिरेखा गौण असूनही महत्त्वपूर्ण कामगिरी बजावतात. नाटकातील विनोदी प्रवेश हे उपरे नसून पूरकच असून, नाटकातील दुःखाच्या पार्श्वभूमीवर ते सुखद वाटत असे सांगून कंकण, नुपूर, गोकुळ, जिवाजीराव कलमदाने इ. विनोदी व्यक्तिरेखा गडकऱ्यांच्या प्रतिभेची स्वतंत्र निर्मिती असली, तरी त्यांचा मूलाधार संस्कृत भाण व तमाशा असल्याचे धोंड यांनी स्पष्ट केले आहे.

स्फुट काव्यलेखनात प्रतिभेचा अद्‌भूत चमत्कार करणाऱ्या गडकऱ्यांची काव्यप्रतिभा नाटकांची पदे करताना काही वेळा आटून जात असे. उदा. ' पुण्य-प्रभाव ' मधील पदे ! ' पुण्यप्रभाव ' मधील दोन–तीन पदे वगळता इतर सर्वच पदे नीरस झाली आहेत. रागदारी संगीत रचनेचे ज्ञान नसल्याने मात्रा मोजून पदरचना करणे त्यांना अवघड जात असावे. त्यांच्या नाटकातील काही पदरचना श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व वि. सी. गुर्जर यांची आहे. संगीताचा कान नसला, तरी त्यांचे काव्यावर प्रभुत्व होतेच ! पारंपरिक स्त्रीगीतांचे स्वरूप आणि लोकसंगीताचा बाज त्यांनी काही पदांना प्राप्त करून दिला व ' राजसंन्यास 'साठी कटाव, लावणी ढंगाची पदरचना केली. तथापि, ' एकच प्याला ' या नाटकातील ' चंद्र चवथिचा ' या पदात लोकसंगीताचा जो बाज साधला आहे, त्याला तोड नाही. त्याची अर्थ-वाही शब्दरचना, भावसौंदर्य, अंगभूत माधुर्य व प्रसंगोचित औचित्य प्रा. धोंड मार्मिकपणे स्पष्ट करतात.

' चंद्र चवथिचा ' लेख प्रा. धोंडांच्या रसिकतेचा प्रत्यय देतो. ' चंद्राच्या ग बागेमध्ये चाफा नवतिचा ' या पदपंक्तीतून व्यक्त होणाऱ्या प्रतिमेवर ते भाष्य करतात. सुधाकरच्या व्यसनामुळे ' एकच प्याला ' मधील सिंधूला वर्तमानकाळ कष्टप्रद वाटतो आणि बालपणीच्या आठवणी काढून ती आपले मन स्थिर करू पहाते. नाटकातील या पार्श्वभूमीवर ' चंद्र चवथिचा...' हे पद म्हणणाऱ्या सिंधूची भावस्थिती वर्णितांना, प्रा. धोंड यांनी जो कल्पनाविलास केला आहे तो त्यांच्या रसिकतेचा प्रत्यय देणारा असला, तरी धक्कादायक आहे. खुद्द गडकऱ्यांच्या मनातही सिंधूची भावस्थिती वर्णिताना ' तसले ' काही विचार आले नसावेत असे वाटण्यास जागा आहे.– आणि म्हणूनच, ' प्रौढत्वी निज शैशवास जपणे हा बाणा कवीचा असे ' याच चालीवर ' वृद्धत्वी निज यौवनास जपणे ' हा काही समीक्षकांचा बाणा असावा असे जाणवत रहाते.

( चंद्र चवथीचा : म. वा. धोंड, मौज प्रकाशन, मुंबई. साठ रुपये )

# कृष्णजन्म : राजेंद्र बनहट्टी

## दाहक, शोधक गहिरी नजर

**प्रा. बाळ गाडगीळ**

नुकतेच 'टाइम्स ऑफ इंडिया' च्या संपादकाला एका वाचकाने पत्र लिहून आश्चर्य व्यक्त केले आहे. यंदा आपण वाचलेल्या महत्त्वाच्या पुस्तकांबद्दल लिहाव-यास संपादकांनी काही वुजुर्गांना सांगितले होते. या वाचकाची तक्रार अशी की सर्वांनी आपण वाचलेल्या इंग्रजी पुस्तकांबद्दलच लिहिले असून कोणीही आपल्या एकाही प्रादेशिक भाषेतील पुस्तकाबद्दल लिहिलेले नाही !

मला वाटते की ही खेदाची गोष्ट आहे. या लेखकांना आपापल्या भाषेत एकही उल्लेखनीय पुस्तक आढळले नसेल काय ? मला तसे वाटत नाही. मला वाटते की आपल्या भाषेतही काही चांगले लिहिले जाते याची आपणास एकतर माहिती नसते किंवा ती माहिती करून घेण्याची गरज आपणास वाटत नाही.

मला कोणा साहेबी संपादकाने विचारलेले नाही. पण विचारले असते तर राजेंद्र बनहट्टी यांच्या 'कृष्णजन्म' या कथासंग्रहाचा मी आवर्जून उल्लेख केला असता. मराठीतील गेल्या वर्षभरातला एक उत्कृष्ट कथासंग्रह म्हणून तो महत्त्वाचा आहेच. पण पुढेमागे जर या कथांचे इंग्रजीत रूपांतर झाले तर त्या रूपांतरातही या कथा उल्लेखनीय ठरतील असा मला विश्वास वाटतो. (आम्हीही थोडेफार इंग्रजी वाचलेले आहे ! असो.)

राजेंद्र बनहट्टींच्या कथा ज्यांनी उशिरा वाचायला सुरुवात केली त्यांना बनहट्टी हा मराठी कथेच्या क्षितिजावर नव्यानेच उगवलेला (एक देदीप्यमान वगैरे) तारा आहे असे वाटते. तसे मी त्यांच्या कथांवरच्या काही परीक्षणांत वाच-लेले आहे. पण माझ्या मते वस्तुस्थिती तशी नाही. कारण जाणकाराने लक्षात घेतल्या पाहिजेत अशा कथांचे लेखन बनहट्टी फार पूर्वीपासून करत आलेले आहेत. 'खेळ' हे त्यांच्या पहिल्या कथासंग्रहाचे नाव. अनेक वर्षांपूर्वी म्हणजे चांगला बारा-पधरा वर्षांपूर्वी तो प्रसिद्ध झाला असेल. म्हणजे त्याच्याही आधी 'खेळ' ही या कथासंग्रहाचे नाव लाभलेली कथा त्यांनी लिहिलेली होती. मी ती जेव्हा 'हंस' मासिकात वाचली तेव्हाच या कलावंताची ताकद माझ्या लक्षात आली होती. अर्थात हे स्वतःचे कौतुक करून घेण्यासाठी मी सांगत नाही. दुसऱ्या कोणीही ती वाचली असती तरी त्या कथेचे सामर्थ्य त्या वाचकाच्या लक्षात आले असते.



अनुक्रमणिका

तेव्हाच पत्र लिहून मी या कथेची दाद वनहट्टीना दिली होती हे माझ्या लक्षात आहे. त्यांच्याही असावे. सारांश, 'खेळ' या राजेंद्र वनहट्टींच्या जवळपास पहिल्या कथेपासून आणि नक्कीच पहिल्या कथासंग्रहापासून वनहट्टींचा कथालेखनातला प्रवास मी न्याहाळत आहे. त्यानंतरचे त्यांचे 'समानधर्मा', 'गंगार्पण', 'अवेळ', 'आंब्याची सावली' हे कथासंग्रह, त्यांच्या 'अखेरचे आत्मचरित्र' आणि 'मरणानंतरचे मरण' या दोन लघुकादंबऱ्या, त्याही आधीची 'अपर्णा' या मी वाचलेल्या आहेत. त्यामुळेच 'कृष्णजन्म' मध्ये वनहट्टीनी मिळविलेले विशेष यश हे त्यांना एकाएकी, अकल्पितपणे मिळालेले यश नव्हे, हे मला माहीत आहे. 'खेळ'-पासून 'कृष्णजन्म' पर्यंत चढत गेलेला त्यांच्या प्रगतीचा आलेख मला स्वाभाविकच वाटतो. अधिकाधिक समर्थ होत गेलेली कलावंत म्हणून त्यांची जिद्द, जाणीव ही त्यांच्या कलेची स्वाभाविकपणे झालेली परिणती आहे आणि यात मला आनंद वाटत असला तरी आश्चर्य मात्र मुळीच वाटत नाही. स्वाभाविकपणे म्हणजे आपोआप झालेली असे मला म्हणायचे नाही. लेखकाचे कर्तृत्व मला अर्थातच नाकारायचे नाही.

'शेजारी', 'कृष्णजन्म' आणि 'शुक्लकाष्ठ' या तीन दीर्घ कथा या कथासंग्रहात समाविष्ट आहेत.

त्यांतील शेवटच्या 'शुक्लकाष्ठ' या कथेबद्दल आधी लिहायचे तर ही एक हलकीफुलकी, रंजक, विनोदी कथा आहे. 'आंब्याची सावली' सारख्या चांगल्या विनोदी कथा वनहट्टींनी लिहिल्या आहेत. त्यांपैकीत 'शुक्लकाष्ठ' ही एका विचित्र अपघाताची आणि कायद्याला भिणाऱ्या, एका प्रामाणिक पण वावळट आणि अव्यवहारी माणसाची कथा. एका जवळजवळ न झालेल्या अपघाताची केस स्वतः-वर चालवून घेण्यासाठी—खरे म्हणजे ओढवून घेण्यासाठी, एक तरुण जीवाचा कसा आटापिटा करतो हे छोटयाछोटया मजेदार बारकाव्यांसह आणि गमतीदार तपशिलांसह वनहट्टींनी सांगितले आहे.

सर्व प्रकारच्या माणसांबद्दल वनहट्टींना कुतूहल आहे आणि त्यांच्या शोधक दृष्टीतून कोणीही सहज सुटू शकत नाही. तीन वर्षे ससेमिरा करीत राहणाऱ्या या शुक्लकाष्ठात एखाद-दुसऱ्या दृश्यात येऊन लुप्त पावणारे नाना शिरसाट स्कूटर-मास्तर त्यामुळेच लक्षात राहतात. देधडक, बेधडक स्वभावाचे तांवरलेल्या डोळयांचे ब्रशछाप मिशावाले हे नाना शिरसाट. मोदकासारख्या वसकट चेहऱ्याचे, तुंदिलतनू स्मॉल कॉज जज् जगदाळे तसेच त्यांचे हे एक क्षणचित्र पहा : '...तरीपण शरीरातून उठणारे भिरभिरे तोलत ते निवांत खुर्चीत डोलत राहिले.' तसेच उंटाकृती, गिधाड चेहरा असणारे आणि उंटछाप पावले टाकणारे काकडे वकील. या अपघात-कथेचा एकप्रकारे विनोदी खलनायक ठरणारा गोविंद मारणे तसाच. 'चेहरा विलंदर, शर्मिदा, डोळे बुजरे, लोचट. भुकेल्याला अचानक खाद्य सापडावे तसे हावरे.'

ही माणसे तर लक्षात राहतातच पण अगदी काकडे वकिलाच्या कोंदट हपिसातील 'चांगले, लठ्ठ, पंखाचे, प्रिंटेड डाससुद्धा' सहजी विसरता येत नाहीत

पण माणसांबद्दलचे वनहट्टींचे कुतूहल उथळ आणि वरवरचे नाही. अभिजात कलादृष्टी आणि मानसशास्त्राचा अभ्यास यामुळे या कुतूहलाला गहिरेपण, एक खोली प्राप्त झाली आहे. वरवर शांत, आनंदी दिसणाऱ्या मानवी मनात खोलवर संताप, द्वेष, मत्सर यांचा तप्त, दाहक लाव्हारस खळाळत असतो. त्याकडे नजर भिडविण्याची त्यांची धडपड आहे. त्या दाहकतेकडे पाहिल्यास दृष्टी भाजून जाण्याची भीती असली तरी तिच्या नजरेला नजर भिडविण्याची शामत या कलावंताजवळ आहे. कोणत्याही मोठ्या कलावंताजवळ हे देणे असतेच. आणि मोठ्या साधनेने असणार, वनहट्टींनी ते प्राप्त करून घेतले आहे.

मायावी कांचनमृगाप्रमाणे असलेल्या मानवी मनाचा पाठलाग करून त्यावर स्वामित्व प्रस्थापित करणे ही कलावंताच्या ध्येयाची परिपूर्ती. 'कृष्णजन्म' आणि 'शेजारी' या दोन दीर्घकथांत वनहट्टींनी हा जीवघेणा पाठलाग केला आहे.

'कृष्णजन्म' ही बाप–लेकांच्यामध्ये पसरलेल्या एका अफाट, अथांग दरीची कथा. दादासाहेब हे एक विद्वान, रसिकमान्य प्राध्यापक, लेखक. त्यांचा अविनाश हा मुलगा–बहुतेक शेंडेफळ. ही नुसती दोन माणसांमधली जनरेशन गॅप नाही. दोन लेखकांमधली, कलावंतांमधलीही आहे. अविनाश ऊर्फ अवीचे बंड प्रस्थापित लेखनशैलीविरुद्ध, पद्धतीविरुद्ध आहे. गेल्या पिढीतले, दरीच्या पलीकडच्या कड्यावर उभे असलेले दादा तळमळीने काय सांगतात याकडे अवीचे लक्ष नाही...'ही असली पुस्तकं आणतोस तू. त्यापेक्षा घरात किती सुंदर खजिना पडला आहे तो पहा एकदा. चांगलं वाचावं, चांगलं सुचतं. चांगलं लिहावं. चांगलं राहावं...' यातले काहीच अवीला मान्य नाही. चांगलं, वाईट, आदर्श या कल्पनांचे संदर्भ त्याच्या जगात बदललेले आहेत. त्यांना नवीन अर्थ प्राप्त झालेले आहेत. आदर्श वाटणारे कृत्रिम, चेतनाहीन असू शकते. त्याच्या एका बक्षीस मिळालेल्या कथेबद्दलही त्याचे मन त्याच्याविरुद्ध बंड पुकारते...'अरे, ही काय कथा आहे? बेगडी, नकली, कृत्रिम. माणसे अशी जगत नाहीत. दगडासारखी. वासना मारून, शरीर मारून. कोरडी ठणठणीत. आणि दादा म्हणतात असेच लिहीत जा. बरे आहे हे. हेच लिहीत जा.'

अवी या कलावंताचा प्रवास खडतर होता. प्रस्थापितांचे प्रतिनिधी त्याचे दादा यांचाच त्याला प्रखर विरोध होता. संत वाङ्मय, ज्ञानेश्वरी यात अवगाहन केलेले दादा अवीला त्याच्या नव्या वाटेपासून परावृत्त करण्यासाठी मारझोड करायलाही कमी करीत नाहीत. पण अवीचे प्रत्युत्तरही तितकेच कडवे आणि कणखर. या दोघा कलावंतांमधील संघर्षाची कमान उंचच उंच होत जाते. आणि या अवखळ पोराने फाडलेल्या ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायाची पाने ज्या शांत

संयमाने चिकटविली जातात त्याच संयमाची परमावधी कथेच्या अखेरीस होते. केवळ योगायोगाने स्पर्धेतील परीक्षणासाठी आलेली अवीची कथा दादांच्या हातून बेभान रागात टरकावली जाते. आणि त्यांच्याच हातून ती परत चिकटवून एकसंध केली जाते... 'अंगांगात ज्ञानेश्वरांची ओवी पुन्हा संचारली... तसेच हात चालत होते. आपोआप. अवीच्या कथेचे कागद एकामागून एक जोडले जात होते. सांधले जात होते. दादा तल्लीन झाले होते. बाहेर रात्र वाढत होती. वाढता वाढता संपत होती. आत बाळंतपण चालूच होते. संपता संपत नव्हते.'

दोन कलावंतांमधील संघर्ष असा एक प्रकारे अमृतानुभवात संपतो. पण अथांग मानसाच्या मंथनातून दरवेळी अमृताचा कलशच बाहेर येतो असे नाही. एखादे वेळी विषकुंभही.

'कृष्णजन्म' इतक्याच कदाचित त्याहूनही अधिक झपाटून टाकणाऱ्या 'शेजारी' या कथेत हा हलाहलाचा कुंभ आहे. एका दहिवरल्या पहाटे, काकडलेल्या वस्तीत, पहाटेच्या झुंजूमुंजू उजेडात स्वप्नवत भासणाऱ्या, प्रतिबिंबासारख्या दिसणाऱ्या इमारतीत ही कथा उकलते.

शिकलेल्या, सुसंस्कृत एवढेच नव्हे तर सुसंस्कार करणाऱ्या चिवळ मास्तरांची ही कथा. ते आणि त्यांच्या पत्नी राधाबाई यांची. शहाणा, सुसंस्कृत कसाही असला तरी चिवळ मास्तर हा एक माणूस होता आणि प्रत्येक माणसाच्या मनात खोलवर जे एक भयानक श्वापद निद्रितावस्थेत असते ते या माणसाच्या मनातही होते. संथ, निवांत, निवृत्त अशा अवस्थेत चाललेले यांचे जीवन एकाएकी ढवळून निघते. शेजारच्या फ्लॅटमध्ये राहणाऱ्या जामदारांची बायको जळून, भाजून मरते. आणि या केवळ अचानकपणे घडलेल्या प्रसंगाच्या चाहुलीने चिवळ मास्तरांच्या मनातले ते सनातन, पुरातन श्वापद जागे होते. या पति-पत्नींच्या मनांचा, संबंधांचा वेध घेत घेत पुढे आपल्या अपरिहार्य अखेरीस जाणारी ही कथा मला वाटते या संग्रहातली सर्वात झपाटणारी, मन सुन्न करून टाकणारी कथा आहे.

बनहट्टींच्या भाषेबद्दल, भाषाशैलीबद्दल स्वतंत्र लेखच लिहावा लागेल. प्रतिमा ते वापरीत नाहीत असे नसले तरी त्यांना प्रतिमांचा सोस नाही. पण आवश्यक तेथे त्या जरूर येतात.

'कृष्णजन्म'मधील एका प्रसंगाचे वर्णन करायचे तर असे होईल : 'ते वळचोळीत, अनुभवीत तो किती तरी वेळ बसून राहिला. उन्हे उतरेपर्यंत दिङ्मूढ असे दिवस. बेशिस्त अनुभवांचे. ओढवलेल्या वेदनांचे. अनिश्चित शोधांचे, दिशाहीन, भिरभिरणारे. भिरकावलेले, अकारण आसुसलेले, रिकामपणाने भरलेले, अज्ञात ओढीने भरकटलेले, क्रियापदाचा वापर न करता योजलेले हे एकेक शब्द एक प्रकारचा ऱ्हिदम् (Rhythm) निर्माण करतात आणि त्यामुळे निवेदनात गतिमानता निर्माण होते.

वनहट्टींच्या विनोदबुद्धीबद्दलही लिहावयास पाहिजे. ते उथळ, भडक, बटबटीत विनोदाचा वापर करीत नाहीत ही समाधानाची गोष्ट आहे. स्वभावजन्य विनोद त्यांचे लक्ष्य असल्यामुळे असे दोष त्यांच्या विनोदात येणे अवघडही आहे. थोर लेखकाने विनोदी लेखन केलेच पाहिजे असे नसले तरी त्याला विनोदबुद्धी जरुर असली पाहिजे असे मला वाटते. त्याशिवाय लेखन खूपच एकारलेले होते, त्याला परिपूर्णता येत नाही असा माझा अनुभव. वनहट्टींमध्ये केवळ विनोदबुद्धी आहे एवढेच नव्हे तर 'शुक्लकाष्ठ' सारखी चांगली विनोदी कथा लिहिण्याची क्षमतादेखील आहे.

कलावंतांची कुंडली मांडू नये असे मर्ढेकरांनी म्हटलेले आहे. पण त्यांच्या हे लक्षात आले नसावे की ही कुंडली अगोदरच मांडलेली असते. म्हणून वनहट्टींच्या कुंडलीबद्दल अंदाज करायचा तर बुद्धीचे चालन करणारा चंद्र या कुंडलीत सुस्थानीच पडलेला असणार याबद्दल मला शका नाही.

(कृष्णजन्म : राजेंद्र वनहट्टी, विशाखा प्रकाशन, पुणे, चाळीस रुपये)

---

# तुंबाडचे खोत : श्री. ना. पेंडसे

## मानवी प्रवृत्तीमधील लढाईपेक्षा इतर बाबींनाच महत्त्व

**अनंत यशवंत खरे**

---

...महत्त्वाचा प्रश्न हा की 'तुंबाडचे खोत' ही लंबीचवडी गोष्ट लिहिण्यामागे पेंडश्यांचा हेतू काय होता ? हेतूशिवाय नुसती कहाणी सांगणे, हे पेंडश्यांच्या पातळीच्या साहित्यिकाचे ध्येय असणे कठीण, असे माझे मत आहे. अनेक पात्रे, अनेक घटना या साऱ्यातून त्याच्या पलीकडचे काही तरी दिसायला हवे, नाही तर अमर चित्रकथांसारखी पोराटोरांची सचित्र पुस्तके घडतात.

कोकणातले आयुष्य दाखवणे हा काही मुख्य हेतू असणार नाही. एक तर पेंडश्यांना प्रादेशिक लेखक म्हटलेले आवडत नाही, असे त्यांनी म्हटले आहे. दुसरे म्हणजे पेंडश्यांचे कोकणावर लिहून झाले आहे, परंतु साहित्यनिर्मितीच्या ऊर्मीत विसरले, हेही शक्य नाही. या कादंबरीत चक्क पेंडश्यांचाच 'एल्गार' कादंबरीतील पात्रे डोकावून जातात. जुने दळण पुन्हा दळण्याचा हा प्रकार नाही ?

कोकणाचे दारिद्र्य आणि मुंबईसारख्या गणिकानगरीच्या पैशांवरच कोकण्यांनी जगणे, असा काही तरल प्रतीकांचा प्रकार असेल का ? सुवत्ता शोधायला

खोतांचे वंशज अमेरिका किंवा वऱ्हाडात जातात. हाही खरा विनोदच. कोकणी माणसाला मुंबई ठेवून घेते, असे जर पेंडश्यांना दाखवायचे असेल तर ते चूक आहे. मुंबईत कोकणी माणसे रहातात, ती गणिकांचे घरगडी म्हणून, प्रियकर म्हणून नव्हे. मुंबईतून कोकणात शेकडयाच्या मनीऑर्डरी जातात, सोनसाखळ्या आणि मोहोरांच्या थैल्या नव्हेत.

कादंबरीच्या शेवटी पेंडसे सिंहावलोकन केल्यासारखे करून खोतांमधले भलेबुरे गुण, भल्याबुऱ्या व्यक्ती, यांची उजळणी करतात. अशी उजळणी करावी लागणे, हे पेंडश्यांचा बार फुसका असल्याची खूण आहे, तो फार पाणचट रूपात उथळ व्यवहारी शहाणपणा, याच्या पलीकडे काहीही नाही. वाईटपणाही असाच गुळमुळीत. पेंडश्यांच्या पात्रांसारखं 'च्यायला' म्हणून सोडून देण्याच्या लायकीचा. एकाही पात्राला आजूबाजूचा निसर्ग, बदलता समाज यांच्यापासून जराही दूर जाऊन स्वतःचे आयुष्य बघता येत नाही. एका फाटक्या ओहोळाला जगन्माता मानणारी खुरटी माणसेच फक्त इथे आहेत.

गांधी–सावरकर या विचारप्रणालींचा थोडासा संघर्ष इथे आहे. गांधी–टिळकवादांचेही संदर्भ आहेत. रामजन्मभूमीसारखा एक बारका वादही आहे. इहवाद किंवा जडवाद, त्यांची भारतीय मनाला वाटणारी भीती, याचेही उल्लेख दुय्यम पात्रांकडून होतात. पण याचा खोतांवर परिणाम नाही. खोतांच्या लेखी गर्भ पाडणारी मुळीच महत्त्वाची. टिळक, आगरकर, गांधी, सावरकर, स्वार्थत्याग, देशप्रेम, स्वार्थ, भोगवाद या साऱ्यांपेक्षा कादंबरीत लैंगिकतेचा सुळसुळाट फार. दीर–भावजय, सून–सासरा असले संबंध, त्यांचा खरेखोटेपणा, त्यातून उपजणारी भांडणं यांचाच पगडा कादंबरीवर आहे. सारी जमात रिकामटेकड्या फुरसतीने लफडी करणारी. त्या काळी टीव्ही नव्हता, म्हणून हे सारे आवश्यक होते असाही एक अघोरी विचार येऊन गेला.

कोकणातल्या आयुष्याची कथा गिरवून बुळबुळीत झालेली. मानवी प्रवृत्तीं-मधली लढाई पोरकट पातळीवरच. लैंगिक व्यवहाराची रेलचेल. मग पेंडश्यांना सांगायचे काय होते ? मला तरी हा प्रश्न महत्त्वाचा वाटतो, कारण या पुस्तका-साठी वाचकाचे भक्कम वीस वीस तास जातात, आणि ठोक दोनशेवीस रुपये कामी येतात. इंग्रजीत अशी 'सेक्स और मारधाडसे भरपूर' पुस्तके असतात. त्यांना 'बेस्टसेलर्स' म्हणतात. ती आगगाडीत किंवा घरातल्या सर्वांत लहान खोलीत वाचण्यासाठी असतात.

पण अशा लिखाणाचीही पथ्ये असतात. अठ्ठेचाळीस साली जनापा मरताना तिथे बेचाळीस साली मेलेला नरसू दाखवायचा नसतो. एकाच माणसाला कधी बोडस तर कधी बागल म्हणायचे नसते. धंद्यात खोट येऊन खचलेला मुखदुर्बळ माणूस मध्येच कर्दनकाळ झालेला दाखवायचा नसतो. भावाच्या बायकोला पात्रांनी

कधी वहिनी तर कधी आजी म्हणायचे नसतें. स्वतःच दिलेल्या वंशावळीची अशी मोडतोड बेस्टसेलर्सचे लेखक करीत नाहीत. इथे तर प्रथितयश, सिद्धहस्त, बुजुर्ग असा लेखक असले गोंधळ दोनशेवीस रुपयांना विकतो आहे.

पेंडश्यांच्या इतर लिखाणावर माझे प्रेम आहे. 'हत्या', 'हद्दपार', 'लव्हाळी' यांची मी पारायणे केली आहेत. 'संभूसाच्या चाळीत' हे नाटक एकदा पाहून आवडून मी अमरावतीवरून अकोल्याला स्कूटरने गेलो आहे.

मोठी कादंबरी लिहायला आशयही मोठा लागतो. हेमिंग्वेसारखा राकट लेखक तर म्हणतो की महाकथा लिहायला खोटारडाच माणूस लागतो. पेंडश्यांना बरेच गुन्हे माझ्या लेखी माफ आहेत. पुस्तकातला प्रचंड शिव्यांचा साठा माफ आहे. लोक बोलतात तसं लिहिलंय. पण मराठी वाचकांच्या थैल्या काही जुलालीच्या कोठीवरून येत नाहीत. स्वतःची जुनी कीर्ती वापरून, वाचकाला मूर्ख समजून, प्रतिभेचा बाजार करून हे पुस्तक लिहिलं आहे, असं वाटलं म्हणून पोटतिडिकीनं हे सांगत आहे.

( तुंबाडचे खोत : खंड १ व २ : श्री. ना. पेंडसे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, २२० रुपये )

---

# मी वनवासी : सिंधू सपकाळ

## वनवासी जीवनाची जिवंत कहाणी

**कु. राजश्री निगडे**

चिखलदऱ्यासारख्या दुर्गम, डोंगराळ भागातील दुःखित आदिवासींच्या उद्धारासाठी तळमळीने काम करणाऱ्या, त्यांना नवजीवन देण्यासाठी झगडणाऱ्या विदर्भाच्या आधुनिक बहिणाबाई सौ. सिंधूताई सपकाळ यांचे हे आत्मकथन म्हणजे असंख्य वनवासींच्या अन्यायाला वाचा फोडणारा हा मुक्त आक्रोश आहे.

आदिवासींच्या जळत्या आयुष्यावर प्रेमाची फुंकर घालणारे हे एक वादळी आयुष्य. त्यांच्या भाषेत नैसर्गिक रांगडेपणा आहे, पण त्या कणखरपणाखालीही मायेचा झरा वाहतो.

समाजकार्य करताना किंवा जनप्रवाहाच्या उलट दिशेने वाहताना संघर्ष करावा लागतो. स्वतःचे दुःख बाजूला ठेवून, दीनदुबळयांसाठी जगताना, त्यांना आलेले अनुभव त्यांनी सरळसरळ सांगितले आहेत. स्त्री म्हणून, त्यांनी कुठला आडपडदा ठेवलेला नाही.

वनवासी म्हणजे वनातील, किंवा ज्याचे जगात कुणी नाही. दोन्ही अर्थांनी सिंधूताई वनवासी. सासरी गेल्यानंतर चार बुकं शिकलेली म्हणून नवऱ्यापासून सारीच मंडळी छळ करीत. तिथे गरीब वनवासींना फॉरेस्ट खाते शेणखत देत नव्हते. म्हणून पहिला लढा दिला. गरिबांच्या तोंडचा घास गरिबांना मिळाला; पण त्यांचे दुर्दैव मात्र आड आले. त्यांच्या मातृत्वाबद्दल नवऱ्याने संशय घेतला, बदफैली ठरवून घराबाहेर घालवले. सासरचे दरवाजे बंद. तशा अवघडलेल्या अवस्थेतही दगडाने नाळ ठेचून मुलीला जन्म दिला. भुकेल्या पोटी वनवासी जीवनाची वाटचाल सुरू झाली... सख्ख्या आईनेही बाहेरचा रस्ता दाखविला. कोणाचाच आसरा नाही. मरणाच्या दारातही मरण नाही. 'ममता'च्या एवढ्याशा जीवाकडे बघून जगण्याचा निश्चय करतात. मिळेल ते कदन्न पोटात टाकून जगणे व येईल त्या प्रसंगाला तोंड देत कडूगोड अनुभवांचे गाठोडे आठवणींच्या खांद्यावर मारीत हा काट्याकुट्यांतील प्रवास चालू होता.

जगरहाटीप्रमाणे मांडलेला संसार संपला, आता वेगळाच संसार सुरू झाला. स्वतःचे घर नाही. स्वतःचा गळा हीच संपत्ती. गाणी, भजने गात पोट भरायचे. लोकांनी दिले तर घ्यायचे, नाही दिले तर मागायचे नाही. 'गोपालकृष्ण महाराज की जय' म्हणत चालू पडायचे. आदिवासी लोकांना एकत्र करण्यासाठी या गोपालकृष्णाचे मोठे मंदिर त्यांनी बांधले.

'जंगले वाचवा–झाडे जगवा', हे सरकारचे धोरण पण वनातील आदिवासींना अभय नाही. आधीच उन, पाऊस, वारा झेलणारी ही माणसे क्रूर श्वापदांना भिऊन जगतात, त्यात सरकारी अधिकाऱ्यांच्या पाशवी अत्याचाराची भर. वनवासींना जंगलात मुक्त प्रवेश मिळावा म्हणून, त्यांनी उपोषण केले. तसेच या आदिवासी बांधवांना सोबत घेऊन त्या वनमंत्र्यापर्यंत मंत्रालयात गेल्या. हे आदिवासी बांधव शहरात आल्यानंतर चकचकीत संडासातील पादुकांचे दर्शन घेतात, खारे तीर्थ पितात. ह्याला जबाबदार कोण ? त्यांना पुढे आणण्याची तगमग वाचकाला अस्वस्थ करून सोडते.

'व्याघ्र प्रकल्पा'च्या नावाखाली क्रूर श्वापदांना अभय आणि तिथल्या आदिवासींवर अत्याचार, ही वस्तुस्थिती सिंधुताई मंत्र्यांसमोर निडरपणे मांडतात. वनवासी लोकांसाठी भांडतात. त्या प्रसंगातील शब्दाशब्दाला धार आहे.

आईवडिलांनी टाकलेल्या एका मुलाला त्यांनी मानसपुत्र मानले, प्रभा नावाच्या मुलीला तिचा सख्खा मामाच विकायला निघतो, त्या दुर्दैवी मुलीला नवे जीवन देण्यासाठी मानसपुत्राशी लग्न लावून देतात. पण गुंडगिरीची जित होते. प्रभाच्या नशिबी नको तो नरकवास येतो. इथे मात्र जिद्दीच्या सिंधूताईंचे हात का तोकडे पडले असा वाचकाला प्रश्न पडतो. त्या तिला का वाचवू शकत नाहीत ? ज्या पुण्याने अमाप प्रसिद्धी दिली, तिथेच त्यांना या प्रसंगामुळे बदनामीची

दगडफेक सहन करावी लागली. (हेही कोडे उलगडत नाही...)

वनवासी लोकांसाठी मदत मिळविण्यासाठी त्या स्वतः कार्यक्रम करतात. रेडिओ, टी. व्ही. मुळेही त्यांना अमाप प्रसिद्धी मिळाली. त्याने त्या हुरळून जात नाहीत. एक जबरदस्त आयुष्य त्यांच्या वाटयाला आले, ठोकरा खात त्या जगऱ्या, खूप भोगले त्याची व्याजासकट परतफेड झालेली आहे. जीवाला जीव देणारे वनवासी आणि असंख्य चाहते त्यांच्यामागे उभे आहेत. पण हे सगळे मिळेपर्यंत माणसाने किती झगडावे ? स्याला काही सीमा ? हा प्रश्न सतत सतावतो.

सिंधूताई गाणे शिकल्या नाहीत, भुकेतून निपजलेला जगण्यासाठी आळविलेला तो आर्त स्वर आहे.

दैवगती फिरली, दैवाने पाठ फिरविली तरी त्या डगमगल्या नाहीत. ईश्वरावरील आणि स्वतःच्या कर्तृत्वावरील श्रद्धा कायम आहे. आपल्या वनवासी बांधवांसाठी संस्कार केंद्र, दवाखाना, वसतिगृह खूप काही करायची जिद्द, त्यांच्या शब्दांतून जाणवते.

निसर्गावर प्रेम करणारे, दगडामातीशी नाते सांगणारे हे एक रानफूल आहे. जिथे जाईल तिथे तिथे आपल्या काव्यगंधाने ते रसिकांना मोहित करते, हेलावून टाकते.

आदिवासींसाठी जगताना सिंधुताईंना स्वतः निर्माल्य झाल्याचे दुःख नाही समर्पणाचा आनंद आहे. या वादळी निर्माल्याचे आनंदी समर्पण 'मी वनवासी'च रूपाने वाचकाला नक्कीच प्रेरणादायी ठरेल !

(मी वनवासी : सौ. सिंधुताई सपकाळ, विंध्य सातपुडा संघर्ष समिती, चिखलदरा (विदर्भ) साठ रुपये)

---

# सप्तपर्णी : प्रा. ब्रह्मानंद देशपांडे

## महानुभावीय साहित्याचे वैशिष्टयपूर्ण संशोधन

**डॉ. चंद्रकांत धांडे**

औरंगाबाद येथील प्राध्यापक ब्रह्मानंद देशपांडे गेले दीड तप महानुभावीय संशोधनात असून त्यांच्या सात लेखांचा समावेश 'सप्तपर्णी' या पुस्तकात केला आहे. औरंगाबाद येथील महानुभाव मठाचे महंत श्री नागराजबाबा यांचा सहवास लाभल्याने त्यांना याविषयी संशोधन करण्याची प्रेरणा मिळालेली दिसते.

या संग्रहातील पहिल्याच लेखात 'वंकनाथ' यांचा शोध घेण्यात आला

आहे. मराठवाड्यात ज्ञानेश्वरांचे आपेगाव प्रसिद्ध आहे तसेच विज्ञानेश्वरांचे आपेगावही प्रसिद्ध आहे. येथे उपलब्ध झालेल्या शिलालेखाचे विवेचन करताना वंकनाथ म्हणजेच विज्ञानेश्वर म्हणजे शिव असा अर्थ डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी लावला असून प्रारंभी हे मंदिर वंकनाथाचे होते, पुढे त्यासच विज्ञानेश्वर म्हणू लागले असे प्रतिपादन केले आहे. डॉ. तुळपुळे यांचा हा तर्क प्रा. देशपांडे यांनी अनेक पुरावे देऊन खोडून काढला आहे. वंकनाथ किंवा बंकनाथ ही शिवाचीच लोकप्रिय नावे असून वंक किंवा वंक या शब्दाचा अर्थ यक्ष! वंकनाथ म्हणजे यक्षाचा स्वामी–शिव! वंकनाथ हे शिवाचे यक्षगणाचे आधिपत्य सूचित करणारे नाव आहे. त्याचप्रमाणे वेंकटेश हेही शिवाचे यक्षगणाधिपत्य सूचित करणारे नाव आहे असा देशपांडे यांचा निष्कर्ष आहे.

'महानुभाव साहित्य आणि शिलाताम्रशासने यांचा तौलनिक अभ्यास' करताना देशपांडे यांना कृष्णदेव व महादेव यादव हे भाऊ संयुक्तपणे राज्यकारभार करीत होते असे उल्लेख आढळले पण शिलालेखात मात्र तसा उल्लेख नाही. कृष्णदेव यादव यास कान्हा म्हणत असत. आपले पराक्रमी आजोबा सिंधणदेव यांच्या नावावरून तो ओळखला जात असे हे ग्रंथातील दाखले व शिलालेखातील उल्लेख यातील साम्यामुळे स्पष्ट होते. आमणदेवाचे डोळे काढले व रामदेव गादीवर बसला ही घटना लीळाचरित्रात व पैठण आणि पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात आली आहे. ही घटना घडली तेव्हा चक्रधरस्वामी सेवता या गावी होते. हे गाव नेमके कोठे आहे याचा शोध देशपांडे यांनी घेतला आहे. याच प्रकरणात सिंधणदेव तृतीय, सिल्लोड येथील वामेश्वर मंदिर, टेकीचा राया, विदर्भातील दरणा आडनावाची क्षत्रिय घराणी, सींदेराणे, पंचनगरे, नवनगरे, पांचोळीची राणी धानुबाई, अग्रनी, श्रीवर्धन हे ग्रंथातील आणि ताम्रपत्रांतील उल्लेख विचारात घेऊन टेकीचा राया म्हणजे रामटेक येथील छोटा राजा, सींदेराणे हे प्रख्यात, प्रतिष्ठित, पराक्रमी सामंत कुळ होते. पंचनगरे, नवनगरे हे व्यापारी मंडळींचे समूह होते, श्रीवर्धन म्हणजेच हल्लीचे बीड असे निष्कर्ष काढले आहेत. 'आसू' या नाण्याचा उल्लेख ग्रंथात वारंवार येतो पण फक्त एकाच शिलाताम्रशासनात हा उल्लेख आढळतो, अन्यत्र नाही अशी माहिती देशपांडे देतात. कडित, कामत, छात्र, पट्टशाळा इत्यादी शब्दसंकल्पनांचाही शोध ते घेतात.

श्री चक्रधरस्वामींचे मोकळे दृष्टान्त प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी प्रकाशात आणले. या चाळीस दृष्टान्तांचा संदर्भ लीळाचरित्र, सूत्रपाठ, लक्षणबंद, आचारबंद इत्यादी ग्रंथांशी लावला असून मतभेदाची स्थानेही स्पष्टपणे नोंदली आहेत.

राजमठ म्हणजे नेमके काय? प्रसिद्ध कवी भास्करभट्ट बोरीकर यांचे बोरी हे गाव नेमके कुठे आहे? 'सरे' या शब्दाचा नेमका अर्थ काय? अवगळा या शब्दाचा नेमका अर्थ काय इत्यादी प्रश्नांची मीमांसा केलेली आहे. 'नरसिंह

मठालाच राजमठ म्हणतात ' हे डॉ. रा. चिं. ढेरे व श्री. अरविंद कुरुंदकर यांचे विधान खोडून काढले असून राजमठ म्हणजे ब्राह्मणांचे निवासस्थान, सार्वजनिक वासगृह, धर्मशाळा असा अर्थ देशपांडे देतात. नरसिंहमठ असूनही राजमठ नसलेल्या नऊ स्थानांची माहिती ते देतात. भास्करभट्ट बोरीकरांविषयी डॉ. य. खु. देशपांडे, डॉ. वि. भि. कोलते, वि. ल. भावे, श्री. भास्करदादा महानुभाव, महंत मुरलीधर-शास्त्री आराध्य यांच्या मतांचा सविस्तर परामर्श घेऊन ' भास्करभट्ट हे जितूर जवळच्या कासारबोरीचे हे पारंपरिक मत अबाधित राहते ' असा निष्कर्ष काढला आहे. सरे म्हणजे जांभळे असा अर्थ नमूद केला असून अवगळा या शब्दाचा अर्थ खड्डे, घळ अथवा पोकळ जागा असा असून ' जीवाला स्थूल प्रपंचात घालून त्याज-कडून ईश्वरविषयक कर्मे घडून यावी अशीच परमेश्वराची योजना असते. सूक्ष्म प्रपंचरचनेनंतर जीवाला अवगळा नामक विभागात ठेवले जाते असा हा विभाग सुखदुःखरहित वेटिंगरूमसारखा आहे ' असा या संज्ञेचा अर्थ देशपांडे सांगतात.

हे संशोधन केवळ वाङ्मयीन किंवा ऐतिहासिक स्वरूपाचे नाही. याचे क्षेत्र फार व्यापक आहे. वेगवेगळे ग्रंथ, शिलालेख, ताम्रपट,' शास्त्रे, शास्त्रीय संकल्पना यांचा मागोवा घेत मांडलेली मते मोलाची आहेत. महानुभावीय वाङ्मयातील अज्ञात शब्दांचा आणि संकल्पनांचा शोध घेण्याचा हा प्रयत्न वैशिष्ट्यपूर्ण आहे.

(सप्तपर्णी : ब्रह्मानंद देशपांडे, कैलास पब्लिकेशन्स औरंगाबाद, चाळीस रु.)

---

# आकांत : सुबोध जावडेकर

## भोपाळ वायुदुर्घटनेच्या धर्तीवरचे कथानक

डॉ. तारा भवाळकर

'... दोन-तीनशे खाटांच्या या इस्पितळात आज हजारो लोकांवर उपचार चालू आहेत... इस्पितळांच्या मागच्या बाजूला प्रेतं हारीने लावून ठेवली आहेत. तरुण, वृद्ध, म्हातारीकोतारी, अजाण बालके, स्त्री-पुरुष, हिंदू-मुसलमान मृत्यूच्या तावडीतून कुणीही सुटलेलं नाही. ट्रक्स येताहेत-प्रेते उचलून दूर नेली जाताहेत. पण ती जागा रिकामी व्हायच्या आतच पुन्हा भरली जाते आहे...' हा उतारा या कादंबरीतला नाही. या कादंबरीला लेखकानं स्वतःचं एक छोटं निवेदन जोडलं आहे, त्यातला हा उतारा आहे. हे निवेदनच खूप बोलकं आहे. लेखकाचं निवेदनातलं पहिलंच वाक्य असं आहे, ' ही कादंबरी भोपाळ दुर्घटनेवर आधारित

आहे का ? या प्रश्नाचे उत्तर 'हो' किंवा 'नाही' असे देणे कठीण आहे.' आणि ते खरेच आहे. काय आहे या कादंबरीत ?

सातान्यासारख्या नव्याने उद्योगधंदे वाढू लागलेल्या एका जिल्ह्याच्या ठिकाणी हे मृत्यूकांड घडते. शहरापासून काही अंतरावर पिकांवरची कीटकनाशकं बनवायचा एक कारखाना आहे. वर्षाला हजार टनाची कारखान्याची क्षमता आहे. प्रत्यक्षात खप कमी म्हणून वर्षाला दोन एकशे टनच निर्मिती होते आहे. स्वाभाविकचं कारखाना प्रचंड तोटयात चालला आहे. म्हणून संचालकांना आता कारखाना नको आहे. तडकाफडकी तो बंदही करता येत नाही. म्हणून जनरल मॅनेजर खन्ना यांना मॅनेजमेंटनं तातडीनं मुंबईला बोलावून घेऊन आदेश दिले. खन्नांनी तडातापडीने युद्धपातळीवर अंमलबजावणी सुरू केली. महत्त्वाचा मुद्दा म्हणजे कारखान्यावरचा खर्च कमी करायचा. त्यासाठी ओव्हरटाइम बंद. शक्य असेल आणि नसेल तिथे काटकसर. वर्षाचा तोटा कागदावर दिसता उपयोगी नाही. त्यामुळे वर्षअखेर हा कारखाना विकून टाकता येईल. खन्नांना आपलं अस्तित्व टिकवायचं आहे. संचालकांचे आदेश अमलात आले नाही तर खन्नांचं अस्तित्व संपणार आहे. खन्ना आपल्या महत्त्वाच्या सहकाऱ्यांना, इंजिनिअर्सना काटकसरीच्या कठोर उपाययोजना करण्याचे आदेश देतात. अनुभवी इंजिनिअर मूर्तीना हे पटत नाही. ते अस्वस्थ होऊन विरोध करू पाहतात. पण खन्नांची मर्जी संपादन करू पाहणाऱ्या मेहता विरोधी सूर लावतात. पुन्हा आपलं अस्तित्व टिकविण्यासाठी मूर्ती अस्वस्थ होऊनही गप्प ! मीटिंगमध्ये काटकसरीचे उपाय सुचवले गेले. कीटकनाशकासाठी अत्यावश्यक असा 'फॉसजिन' नावाचा विषारी वायू भल्या प्रचंड लोखंडी टाक्यांतून साठवला जातो. तो रेफ्रिजेटरच्या साह्याने थंड ठेवावा लागतो. त्यावर ६० टक्के वीज खर्च होतो. मग रेफ्रिजेशनच बंद करण्याची सूचना येते. हा आपल्या हातानं आपल्या पायावर धोंडा पाडून घेणं होतं. भास्कर हा तरुण इंजिनिअर या सूचनेनं संतापतो. अस्वस्थ होतो. एखादा अनुभवी नगरकर फक्त गप्प राहतो. मेहता तर बेफिकीर आणि क्रूरच ! रेफ्रिजेशन बंद करण्यातले धोके माहीत असूनही निरनिराळया व्यक्तींच्या या निरनिराळया प्रतिक्रिया. सगळे पायापुरते पाहणारे. तेवढयापुरता स्वार्थ सर्वांना घेरून राहिलेला.

या कारखान्याच्या निमित्तानं उभी राहिलेली कॉलनी. तिथल्या माणसांची कौटुंबिक जीवनंही कारखान्यातल्या व्यापारी संबंधांनी वेढलेली. ऑफिसरची बायको आणि अन्य स्त्रिया यांच्यातले हेवेदावे, दिखाऊ मैत्री, स्वार्थ सगळे कादंबरीतलं वातावरण जिवंत करण्यासाठी पार्श्वभूमीला तरलत्या पडद्यासारखं ! जणू औद्योगीकरणाच्या झपाटयात माणसंही यंत्रंच झालीत. स्वतःच्या क्षणिक अस्तित्वापलीकडे कुणाला कसलं भान नाही. एखादा मूर्ती, एखादा भास्कर, एखादा चतुर्थश्रेणी फिटर अजून आपलं माणूसपण सांभाळून आहेत. पण भोव-



अनुक्रमणिका

तालची प्रचंड बेफिकिरी, स्वार्थ आणि राजकारणी मंडळींपासून ते अगदी तळा-पर्यंतच्या भ्रष्टाचारात वेढलेल्या गुदमरवून टाकणाऱ्या वातावरणात ते अगतिक ठरत आहेत. प्रत्येक जण आपल्या खाजगी जीवनातले भावबंध जतन करू पाहत आहेत. सुट्टीत वडिलांकडे आलेली सुमित्रा आणि भास्कर यांच्यात काही नाजूक भावबंध निर्माण होऊ पाहत आहेत. तरी भास्कर संभाव्य धोक्याच्या कल्पनेनं अस्वस्थ आहे. वरिष्ठांची बेफिकिरी आणि स्वार्थ पाहून पळून जावंसं वाटतं. पण जाऊ शकत नाही.

'फॉसजिन' हा विषारी वायू भोपाळ दुर्घटनेला कारण झालेल्या 'मिथाइल आयसोस्यानेट' इतकाच जवळ जवळ विषारी. लेखकाने केलेला हा किरकोळ बदल. स्वतः केमिकल इंजिनिअर असल्यानं तांत्रिक तपशील अचूक असले तरी कादंबरी तांत्रिकतेत अडकून पडत नाही. अनिर्बंध औद्योगीकरण, माणसा–माणसां-तले व्यापारीकरण, स्वार्थ या पसाऱ्यात अस्वस्थ होणारा तरुण भास्कर हा सदसद्विवेकबुद्धी जागी असलेल्या माणसांचा प्रतिनिधी. पण त्याचे एकट्याचे प्रयत्न अपुरे पडतात. टाकीतल्या विषारी वायूचे तापमान वाजवीपेक्षा वाढू लागले आणि मग अपुऱ्या किंवा नगण्य सुरक्षा यंत्रणेचा व्हायचा तो दुष्परिणाम झाला. कारखान्याभोवताली नव्यानं वाढलेल्या झोपडपट्टीतले हजारो जीव, वसाहतीतली शेकडो माणसं कीटकनाशकाच्या कारखान्यातल्या वायुगळतीनं कीडामुंगीसारखी तडफडून गुदमरून गेली... अगदी भास्करसकट... आणि त्याच वेळी 'स्वप्नांची गाडी भर वेगानं कारखान्याच्या विरुद्ध दिशेला' धावली. मात्र ते पहायला कुणीच शुद्धीवर नव्हतं... एक भीषण भयाण सुन्न अनुभव घेत आपण कादंबरी संपवतो कादंबरी संपते. विचार चालू होतो.

लेखकही याच विचारानं कादंबरी लिहायला प्रवृत्त झाला. प्रास्ताविकाचा शेवट करताना तो लिहितो, 'मरणारी पण माणसेच. मारणारी पण माणसेच... विषारी वायू हे फक्त निमित्त... कामगारांची बेपर्वाई–व्यवस्थापनाचा नफेखोर-पणा, सरकारी अधिकाऱ्यांची खाबूगिरी– ही सगळी एकेरी, फार बालबोध उत्तरे आहेत. भोपाळसारख्या शोकांतिकेचे धागेदोरे खूप खोल गेलेले असतात, ही जाण आपण दाखवणार आहोत का? भोवंडून टाकणाऱ्या गतीने होणाऱ्या औद्योगी-करणामुळे निर्माण होणारे मानसिक ताण नीट समजून घेतले नाहीत तर... भोपाळची पुनरावृत्ती अटळ आहे, कदाचित तुमच्या शहरात, तुमच्या भागात, तुमच्या शेजारच्या कारखान्यात सुद्धा!

हा नुसता धोक्याचा इशारा नाही. त्यामागे 'नरेचि केला हीन किती नर!' ही सनातन वेदना आहे. सुबोध जावडेकर या तरुण लेखकाच्या कथा आजच्या परिभाषेत 'विज्ञानकथा' म्हणून लोकप्रिय होत आहेतच. पण विज्ञानाचा उग्र भीषण उपयोग करणारा माणूस हाच त्याच्या लेखनाचा केंद्रबिंदू आहे.

यंत्रयुगानं माणसाची 'मुंगी' केल्याचं मर्ढेकरांसारख्या द्रष्टया कवीनं चाळीस वर्षांपूर्वीच नोंदवलं होतं. त्याचं हे पुढचं पाऊल... हे निखळ वास्तव !

विज्ञान शाप की वर ? वगैरे प्रश्नांचा वालिशपणा ओलांडून माणूसच माणसाचा शाप होऊन येत असल्याचं भीषण वास्तव लेखकानं अत्यंत प्रत्ययकारी शैलीत मांडलं आहे. हा 'आकांत'. एका परीने हा अनाहत 'आकांत' आजच्या जीवनाला सर्वांगानं ग्रासून राहिला आहे.

( आकांत : सुवोध जावडेकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई. २५ रुपये )

---

## म. रा. साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई ३२ यांची १९८८ मधील प्रकाशने

- **सेनापती बापट** – वामनराव बापट व ग. प्र. प्रधान, खंड ४, पृ. ३४९, ५६ रु.
- **लोकहितवादी** – समग्र वाङ्मय–संपादक–गोवर्धन पारीख व इंदुमती पारीख, खंड १, रु. १४६
- **साताराचे प्रतिसरकार** – ल. ग. कुलकर्णी, पृ. ११२, रु. ३३.
- **महात्मा फुले समग्र वाङ्मय** – संपादक–धनंजय कीर, स. गं. मालशे, पृ. ५६० परि. ४६, रु. ५०, ३ आ.
- **महाराष्ट्रातील दप्तरखाने** – वि. गो. खोवरेकर, पृ. २७३, रु. ५२.
- **आधार वड** – सुलभा मोघे, पृ. १८८, रु. ४०.
- **भारतातील मुसलमानांपुढील पेच** – अनु. अच्युत खोडवे, पृ. १२८, रु. ३०.
- **श्रीसंत शुभराय महाराज** – चित्रचिरंतन, पृ. ८४, १९८८.
- **मराठा वॉल पेंटिंग्ज** – वी. के. आपटे, ६० रुपये.

### कथासंग्रह

- **वाटा आडवाटा** – वामन होवाळ, स्वयंदीप प्रकाशन, १९९/७८८८ 'अंजली-माला' कन्नमवार नगर २, विक्रोळी पूर्व, मुंबई, पृ. १२६, ३२ रु.
- **मरणमाळा** – केशव मेश्राम, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे २, पृ. ११७ रु. ४०, १९८८.
- **दुरंगी होराशी सामना** – अनंत भावे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, पृ. १५२, ४० रु., १९८८

---

# १९८८ मधील पुस्तके : एक दृष्टिक्षेप

अनिल बळेल

१९८८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांचा धावता आढावा घेताना लक्षात येते की, हे वर्ष जी. ए. कुलकर्णी यांचे होते. जी. एं. च्या लेखनाप्रमाणेच जी. ए. या व्यक्तीबद्दल जागरूक मराठी वाचकाच्या मनात एक कुतूहल होते, हे लक्षात घेता असे होणे साहजिकच जी. एं. च्या मृत्यूनंतर लगेचच त्यांचे 'माणसे– अरभाट आणि चिल्लर' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. आपल्या आयुष्यात येणारी काही माणसे अरभाट म्हणजे उच्च खानदानी असतात तर काही चिल्लर म्हणजे नगण्य अशा माणसांनी घडलेले आपले आयुष्यच जी. एंनी वाचकांसमोर ठेवले आहे. या पुस्तकाच्या बरोबरीनेच प्रसिद्ध झालेल्या 'डोहकाळिमा' या (संपादक– म. द. हातकणंगलेकर) पुस्तकात जी. एं. च्या चार संग्रहातील १५ निवडक कथा वाचावयास मिळतात.

'जी. ए. एक पोर्ट्रेट'मध्ये सुभाष अवचट यांची लेखणी, कुंचला व कॅमेरा या तिन्हींचा संगम झाला आहे. जी. ए. व अवचट दोघेही थोडेफार त्यामुळे उलगडतात जी. एं. च्या कथालेखनातील काही व्यक्तिरेखांचे विश्लेषण कृष्णचंदन (धनंजय आचार्य) यात आले आहे.

जागरूक मराठी वाचकाला हलवून गेलेले दुसरे लेखक म्हणजे नरहर कुरुंदकर. त्यांच्या स्मृतिदिनी प्रसिद्ध झालेल्या 'वाटचाल'मध्ये त्यांची स्वगते, मनोगते आणि शब्दचित्रे एकत्रित करण्यात आली आहेत. या लेखांतून घनिष्ठ आप्त, जीवाभावाचे मित्र आणि चालून झालेला काळ याचे चित्र उभे केले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनकार्याचे वेगवेगळ्या दृष्टिकोनातून महत्त्व पटवणारी अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यातील प्रा. गंगाधर पानतावणे यांच्या 'पत्रकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर' या पुस्तकाचा उल्लेख करायला हवा. आपल्या विचाराच्या प्रसारासाठी आणि इतरांच्या न पटणाऱ्या गोष्टींवर हल्ला करण्यासाठी बाबासाहेबांनी केलेल्या पत्रकारितेचा यात विचार केला गेला आहे.

पारंपरिक सौंदर्यशास्त्र हे ब्राह्मणी असून ते नव्या जाणिवांच्या ग्रामीण–दलित साहित्याचा अभ्यास करण्यास निरुपयोगी आहे. यास्तव 'अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र' असण्याची गरज शरद पाटील यांना जाणवते. (परंतु या

पुस्तकाच्या प्रकाशन समारंभातच अशी वेगळी चूल करणे चुकीचे आहे, असे बोलले गेले. )

विख्यात साहित्यिक श्री. जयवंत दळवी ह्यांनी प्रथम 'बॅरिस्टर' कथा लिहिली. त्यावरून 'अंधाराच्या पारंब्या' ही कादंबरी लिहिली आणि काही कालावधीनंतर याच कादंबरीचे 'बॅरिस्टर' हे नाटक केले. लेखक आपली साहित्य-कृती अशी विविध घाटांतून का मांडतो, त्यामुळे त्याच्या साहित्यगुणांवर काय परिणाम होतो, इत्यादी वाङ्मयीन प्रश्नांची सखोल चर्चा करणारे उमा दादेगाव-कर यांचे पुस्तक आहे– 'बॅरिस्टर : तीन रूपे'

'अश्वत्थाची सळसळ' या पुस्तकात ज्ञानेश्वर नाडकर्णी यांचे साहित्य–कला विषयक लेखांचे संकलन आढळते, तर 'अंगणातलं चांदणं' हे रवींद्र पिंगे यांचे पुस्तक म्हणजे चांदणं होऊन लेखकाच्या अंगणात सहजगत्या पाय मोकळे करून गेलेल्या मित्रांचे स्मरण आहे, साहित्य, साहित्यिक, साहित्यिक घडामोडी आणि त्यामागचे राजकारण हे सारे जवळून बघितलेल्या– प्रसंगी हाताळलेल्याही ग. वा. बेहरे यांनी ते सारे 'अक्षरयात्रा' मध्ये एकत्रित केले आहे.

एक काळ असा होता की सर्वच क्षेत्रात महाराष्ट्र आघाडीवर होता. आता मात्र त्याची सर्वत्रच पीछेहाट झाली आहे. हे असे का झाले याचा उडत उडत उहापोह अरुण सारथी या टोपण नावाने केला आहे. महाराष्ट्राची शोकांतिकामध्ये.

'मौजे पारलई' येथील पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे, मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष रामचंद्र वामन अलुरकर या जिवाभावाच्या तीन मित्रांनी जुलै १९४३ ते ऑक्टोबर १९४५ या कालावधीत बडोद्याच्या 'अभिरुची' मासिकात 'पुरुषराज अळूरपांडे' या नावाने उणेपुरे सात लेख लिहिले होते. वक्रोक्ती, उपरोध, विडंबन, उपहास अशा विनोदाच्या विविध अंगांनी गाजलेले हे लेखन, ते 'तिघात मिळून' कसे घडले याच्या प्रस्तावनेसह आता पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले आहे.

मराठी वृत्तपत्रातून थोडक्यात आलेल्या किंवा अगदीच न आलेल्या परदेशी बातम्या, आंतरराष्ट्रीय क्षेत्रातील महत्त्वाच्या घटना आणि त्या निमित्ताने संबंधित व्यक्ती यांवर भाष्य करणारे 'परिक्रमा' लता राजे यांच्या लेखनाचे संकलन आहे तर सदा डुम्बरे यांच्या अशाच चुरचुरीत वृत्तपत्रीय लेखनसंग्रहाचे नाव आहे 'आरसपानी'. भास्कर नंदनवार यांचे 'शतपावली' हे पुस्तकही नागपूरच्या 'तरुण भारत'मधून याच शीर्षकाखाली केलेल्या ललित लेखनाचे संकलन आहे. काही व्यक्तिगत आठवणी असल्या तरी हे लेखन प्रामुख्याने साहित्य आणि साहित्यिकांविषयीच आहे. वयाच्या पंचविशीच्या आसपासचे अनुभव मिस्किलपणे आणि लालित्यपूर्णतेने मांडणारे आनंद नाडकर्णी यांचे पुस्तक आहे 'गद्धेपंचविशी'

'समस्याः साहचर्याच्या !' हे माहितीपूर्ण पुस्तक वाचनीयही झाले आहे. कारण प्रत्यक्ष जीवनातील केसेस– अर्थात नाव बदलून देऊन वागेश्री परीख आणि

प्रतिभा घीवाला या लेखिकाद्वयींनी वैवाहिक जीवनातील तुटत जाणारे भावबंध परत कसे जुळविले जातील आणि अपवादात्मक स्थितीत का होईना घटस्फोट घेणंच कसे उचित ठरेल हे या पुस्तकात दाखवून दिले आहे.

स्त्री–मुक्ती, स्त्रीचे माणूसपण, स्त्रीची जडणघडण, विवाहात स्त्रीच्या व्यक्तित्वाची होणारी कोंडी यागद्दल आपण सारखे बोलत वा लिहित राहिले पाहिजें, कारण असे करणे म्हणजे एक प्रकारचे ओलांडणंच ' आहे. या जाणिवे-पोटी लीला पाटील यांनी केलेले लेखन 'ओलांडताना' या पुस्तकात वाचायला मिळते.

'वेधक व्यक्ती, वेधक प्रसंग' हे चंपा लिमये यांचे पुस्तक दोन भागात आहे. पहिल्या भागात आपले जोडीदार मधु लिमये तसेच राम मनोहर लोहिया, जयप्रकाश नारायण इ. राजकीय नेते, चित्रकार अरुणा पुरोहित, सोनल मानसिंग, नर्तिका उमा शर्मा, अशी व्यक्तिमत्त्वे टिपली आहेत तर दुसऱ्या भागात गोवा मुक्ती संग्रामातील रोमांचकारी आठवणी सांगितल्या आहेत.

भटके म्हणवणारे लोकही लग्न करून संसारात अडकतात. हे घडते कसे आणि या संसाराचे पुढे काय होते याचा वेध घेणारे 'भटक्यांचे लग्न' हे उत्तम कांबळे याचे पुस्तक वाचनीय आहे.

'माझेश्वरी' हे खरे म्हणजे वसंत सबनीस यांचे 'तुणतुणे' आहे. आपण लेखक कसे झालो, नट कसे झालो, येथपासून ते आयुष्यात आपली फटफजिती कशी झाली येथपर्यंतच्या घटना सबनीसांनी वाचकांना विश्वासात घेऊन सागितल्या आहेत. अर्थात त्यांनीच म्हटल्याप्रमाणे हे सारे सविस्तर नसले तरी बोध न होण्या-इतके अपुरेही नाही.

'घरजिव्हार'मधील पद्माकर गोवईकर यांचे लेख बहुतांशी 'गोवईकरां'-विषयीच आहेत. 'नावापुढे गाव लावतो मी, सातारा' 'पुरुषोत्तम वामन' आणि 'इंद्रजीतचे दिवस' या लेखांतून आपले गाव, वडील व स्वतःचे उमलणे सुरेख रेखाटले आहे.

रमेश मंत्री हे जसे विनोदी लेखक आहेत तसेच ते प्रवास वर्णनकारही आहेत. 'कात्रजचा घाट'मध्ये प्रासंगिक घटनांवरची खुसखुशीत मल्लीनाथी आहे. तर 'वैभवाचे दिवस'मध्ये प्रवासातील गमतीजमती.

मराठी कथा केवळ छापील स्वरूपात न ठेवता ती प्रत्यक्षपणे वाचकांपर्यंत पोहोचवण्याचे काम ज्यांनी केले त्यात व. पु. काळे सतत आघाडीवर राहिलेले आहेत. कथाकथनाचे अक्षरशः हजारो कार्यक्रम करत असताना विविध प्रकारचे शेकडो अनुभव त्यांच्या गाठीशी साठणे अगदी स्वाभाविकच. त्यातलेच काही वाचनीय अनुभव लक्षणीय मांडणी आणि भरपूर छायाचित्रांसह प्रसिद्ध झाले आहेत. '**ककची क**' ( कथाकथनाची कथा ) या पुस्तकात.

परदेशात स्थायिक झालेले भारतीय अलिकडे 'तिकडील जग' उलगडून दाखवत असतानाच 'तिकडील' आणि 'इकडील' यात आपली होणारी घालमेलही वाचकांसमोर ठेवू लागले आहेत. अशा प्रकारात अलिकडेच प्रसिद्ध झालेले नवे पुस्तक आहे संध्या कर्णिक यांचे 'दिवा कुणाचा तेवत राही'

'चंदेरी चित्रहार' आणि 'कला साहित्य व संस्कृती' ही रा. ग. जाधव यांची दोन पुस्तके. मुख्यतः चित्रपट विचार आणि साहित्य विचार मांडणारीच आहेत. 'पूर्वेची प्रभा' हे राम शेवाळकर यांचे पुस्तकही उल्लेखनीय आहे.

'वालाँग' ही एका युद्धकैद्याची बखर असून ती कर्नल श्याम चव्हाण यांनी लिहिलेली आहे. बावीस वर्षांच्या सैनिकी जीवनात १९६२ मध्ये चीन आणि १९६५ व ७१ मध्ये पाकिस्तान अशी तीन युद्धे अनुभवलेल्या कर्नलची ही शौर्यगाथा मराठी साहित्याच्या लेखनमर्यादा ओलांडणारी ठरणार आहे.

फारच थोडे स्मृतिग्रंथ असे असतात की ते त्या व्यक्तीच्या कर्तृत्वाला साजेसे असतात. छबिलदास चळवळीचे जनक 'रंगायन' – 'आविष्कार' – 'चंद्रशाळा' या नाट्यसंस्थांचे अध्वर्यू उत्तम अभिनेते अरविंद देशपांडे यांच्या प्रथम स्मृतिदिनी 'रंगनायक' हा स्मृतिग्रंथ मात्र या साऱ्याची नुसतीच नोंद घेणारा नसून त्या धडपडीतील माणूसही शोधणारा आहे.

कर्तृत्ववान व्यक्तीच्या साठी–पंचाहत्तरी निमित्ताने गौरव ग्रंथ प्रकाशित होतात. विरोधकालाही कौतुक वाटावे असे यश मिळवलेल्या विजय तेंडुलकर यांच्या 'साठी' निमित्ताने 'साहित्यातून सत्याकडे' हा त्यांच्याच निवडक साहित्याचा संग्रह प्रसिद्ध झाला आहे. एकांकिका–नाटक–कथा–पटकथा–वृत्तपत्रीय लेखन–व्यक्तिचित्रे–पत्रे–छायाचित्रण यांचे अस्सल 'तेंडुलकरीय' नमुने शिरीष पै–प्रिया तेंडुलकर यांनी निवडलेले असून तेंडुलकरांची दीर्घ मुलाखतही दिली आहे.

'आजचा महाराष्ट्र' हा साथी विनायकराव कुलकर्णी गौरवग्रंथ आहे. (संपादक– पन्नालाल सुराणा–किशोर बेडकिहाळ) गं. बा. सरदार यांच्या ८० व्या वाढदिवशी त्यांच्या निवडक लेखांचा 'परंपरा आणि परिवर्तन' संग्रह प्रकाशित झाला (संपादक– मो. स. गोसावी– वि. शं. चौघुले)

'माझा नाट्यलेखन–दिग्दर्शनाचा प्रवास' (संपादक–वि. भा. देशपांडे) मध्ये मराठीतल्या नामवंत प्रयोगशील लेखक–दिग्दर्शकांनी आपला जडणघडणीचा आणि निर्मितीतल्या विविध पैलूंचा वेध घेतला आहे.

मानवी भावभावनांशी नाग–सर्पांचे अतूट नाते आहे. हे नाते उकलण्याचा मराठी ललित साहित्यिकांनी प्रयत्न केला आहे. नाग–सर्पाचे आदिपुरुष आणि रक्षक म्हणून जे रूप आहे त्याचा प्रत्यय देणाऱ्या जी. ए. कुलकर्णी, मधु मंगेश कर्णिक, चारुता सागर, शंकर पाटील, विद्याधर पुंडलिक यांच्या कथा अरुणा ढेरे



अनुक्रमणिका

यांनी ' नागमंडल ' या पुस्तकात एकत्रित करून या विषयाचे विश्लेषण करणारी वाचनीय प्रस्तावनाही लिहिली आहे.

व्यंकटेश माडगूळकर यांच्या अस्सल दलित–ग्रामीण कथांचा ' ओझं ' हा संग्रह गो. मा. पवार यांनी संपादित केला असून आपल्या प्रस्तावनेत त्यांनी माडगूळकरांवर घेतल्या जाणाऱ्या अक्षेपांना उत्तर दिले आहे. दि. बा. मोकाशी आणि सदानंद रेगे या मनस्वी कथाकारांच्या निवडक कथा या वाङ्मय प्रकारावर मनापासून प्रेम करणाऱ्या अरविंद गोखले यांनी आपल्या मार्मिक प्रस्तावनेसह वाचकांसमोर ठेवल्या आहेत.

' सर्वोत्कृष्ट शन्ना ' हा शं. ना. नवरे यांच्या निवडक तेवीस कथांचा संग्रह शंकर सारडा यांनी संपादित केला आहे. भा. रा. भागवत यांच्या विपुल विनोदी लेखनातील वेचक लेखन लीलावती भागवत यांनी ' भाराभर गवत ' नावाने पेश केले आहे. प्रभाकर अत्रे यांच्या निवडक कथांचाही संग्रह प्रसिद्ध झाला आहे. (संपादक– म. ना. अदवंत)

१९६६ ते १९८२ अशा तब्बल सोळा वर्षांच्या कालावधीत ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनी लिहिलेल्या निवडक तेरा कथा ' प्रस्थान ' या संग्रहात एकत्रित केल्या गेल्या आहेत. रूढार्थाने या कथांना काही कथानक असले तरी त्या निव्वळ कथानकप्रधान कथा नसून त्या मानवी मनाचे अगम्य, अबोध रूप धुंडाळणाऱ्या अंतर्वेधक कथा आहेत. मानवी मनाचे असेच अगम्य कप्पे दाखवणाऱ्या राजेंद्र बनहट्टी यांच्या तीन दीर्घकथांचा संग्रह ' कृष्णजन्म ' नावाने प्रसिद्ध झाला आहे.

एक स्त्री म्हणून पुरुष प्रधान समाजात जीवन व्यतीत करताना स्त्रीच्या मनात जी स्पंदने–आंदोलने चालू असतात त्यांचे चित्रण करणाऱ्या कथा विजया वाड यांच्या ' अवेळ ' या संग्रहात वाचावयास मिळतात.

' रतिकथा मंजिरी ' या आनंद साधले यांच्या मिस्किल कथा कथासंग्रहात चावटपणा विखुरलेला आढळतो तर ' हुलकावणी ' हा रमेश मंत्री यांचा कथा-संग्रह खुसखुशीतपणाचा आनंद देतो.

मराठी ऐतिहासिक कादंबरीत अढळ स्थान मिळवेल अशी कादंबरी जवळ जवळ वर्षअखेरीस प्रसिद्ध झाली ' पानिपत '. मराठ्यांच्या इतिहासातील ' पानिपतचे युद्ध ' या महत्त्वाच्या घटनेचा सर्वांगीण अभ्यास करून विश्वास पाटील या नव्या दमाच्या लेखकाने ती लिहिलेली आहे. वर्षअखेरीसच प्रसिद्ध झालेली दुसरी कादंबरी आहे ' प्रबुद्ध ' डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनावरच्या या कादंबरीचे लेखक आहेत भा. द. खेर.

केशव केळकर यांची ' परिमला ' कादंबरी म्हणजे त्यांची आत्मकथाच आहे. या कादंबरीची नायिका आहे त्यांची दिवंगत पत्नी प्रतिमा. फुले कुस्करली तरी

त्याचा परिमळ मागे राहतो तशी लेखकाच्या भावजीवनात परिमला होऊन राहिलेली ही कहाणी तशी चारचौघांसारखीच असली तरी हृदयंगम आहे.

'आनंदओवरी' ही लीला गोळे यांची कादंबरी ऐहिक सुखाच्या आनंदाहूनही श्रेष्ठतम असा काही आनंद आहे आणि त्याचा शोध लागला की सारे षड्रिपू क्षुल्लक आहेत असे मानणाऱ्या आणि तसेच जीवन जगलेल्या बहिणाई या संत तुकारामांच्या शिष्येच्या जीवनावरची आहे.

शिक्षण क्षेत्रातील भ्रष्टाचार हा केवळ आर्थिक नसतो तर बौद्धिक वैचारिकही असतो आणि त्याचा कळस विद्यापीठात गाठला जातो हे आज दिसणारे दृश्य 'बॉनसाय–सुभाष भेंडे' आणि 'चक्रव्यूह–पठारे' या कादंबऱ्यांतून भेदकपणे चितारले गेले आहे.

'वृत्तान्त' ही रूढार्थाने कादंबरी नव्हे पण कादंबरीच मानले तर तिचा नायक आहे शंभर वर्षांचा काळ. पूर्वजांचा छडा लावण्याच्या नादात श्री. ज. जोशी पार पेशवाईच्या अखेरीपर्यंत गेले आणि कथानिवेदकाच्या बरोबरच इतरांच्याही घराण्यांचा चक्रावून टाकणारा इतिहास उलगडत गेला. त्याचाच हा 'वृत्तान्त' झाला.

दिवसेंदिवस केवळ शहरांचेच नव्हे तर एकूण जीवनाचेच औद्योगीकरण होत आहे. इतके दिवस जपलेली जीवनमूल्ये पाहता पाहता नष्ट होत आहेत आणि त्यांची जागा या औद्योगिक अर्थव्यवस्थेला साजेशी आणि काही प्रमाणात अपरिहार्य असलेली जीवनमूल्ये घेत आहेत. ह. मो. मराठे यांच्या 'मार्केट' या कादंबरीचा हाच मुख्य विषय आहे.

शं. ना. नवरे यांची 'आनंदाचं झाड' ही कादंबरी जीवनाकडे आनंदी दृष्टीने बघायला लावणारी आहे तर 'आकान्त' मध्ये सुबोध जावडेकर यांनी भोपाळ वायू–दुर्घटनेचा वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. गो. ना. मुसळे यांनी 'काममात्र' या कादंबरीत लैंगिक शिक्षण हाच विषय जाणकार–तज्ज्ञांशी चर्चा करून हाताळला आहे. सुहास शिरवळकर यांची पन्नासावी 'झूम' ही कादंबरी काही नशीले अनुभव पेश करणारी आहे. नव्या आणि सध्याच्या पिढीचे यथार्थ चित्रण करणारी कादंबरी असा जिचा उल्लेख करता येईल अशी कादंबरी अनिकेत जावरे या ह्याच पिढीतील नव्या लेखकाने लिहिली आहे– 'जवानी दिवानी अर्थात उद्धव दीक्षितचा प्रेमभंग'

रुढी, परंपरांचा बळी म्हणजे देवदासी– त्याच परंपरांचा आणखी एक बळी म्हणजे जोग्या ! त्यांचे जीवन देवदासींपेक्षाही भयावह. राजन गवस यांनी आपल्या 'भंडारभोग' कादंबरीत जोगत्यांच्या या जीवनाबरोबरच चौंडक्या, मेळ्यातील जोगतिणी यांचे एक विश्वच वाचकांसमोर उभे केले आहे.



अनुक्रमणिका

'निरगाठी आणि चंद्रिके ग सारिके ग' ह्या गौरी देशपांडे यांच्या दोन लघुकादंबऱ्या एका संग्रहात प्रसिद्ध झाल्या आहेत. चाकोरीबाहेरचे जगण्याचा एक अमोघ अनुभव त्यातून व्यक्त झाला आहे.

'रामायणा' पाठोपाठ दूरदर्शनवर 'महाभारत' आले आणि प्रकाशन क्षेत्रातही महाभारताच्या अनेक आवृत्त्या निघू लागल्यात, त्यात लहानांबरोबरच मोठ्यांनाही वाचावेसे वाटेल असे 'महाभारत' पाच भागात कादंबरी स्वरूपात— सादर केले आहे माधव कानिटकर यांनी.

बालगंधर्व जन्मशताब्दीनिमित्ताने जी पुस्तके प्रसिद्ध झालीत त्यातील 'तो राजहंस एक' वादग्रस्त ठरले. या चरित्र ग्रंथाचे लेखक आहेत बाळ सामंत. नरुभाऊ लिमये यांनी लिहिलेले प्रसिद्ध उद्योगपती कल्याणी यांचे चरित्र उद्‌बोधक ठरणारे आहे.

प्रसिद्ध साहित्यिक रणजीत देसाई यांच्या पत्नी माधवी देसाई यांचे 'नाच ग घुमा' हे आत्मचरित्र व्यक्तिगत दुःख सांगणारे आहे तर पंचाहत्तरी ओलांडलेल्या मथुताई आठल्ये यांच्या 'मागे वळून' या आत्मकथनात सेवाभावी वृत्तीने केलेल्या डॉक्टरकीतील अनुभव वाचावयास मिळतात आणि जुन्या पिढीतील बालविधवेची ही धडपड थक्क करते.

पंचाहत्तरीतीलच दुसरे आत्मकथन आहे खाशेराव सावंत यांचे 'झाकली मूठ'. अगदी लहान वयात घर सोडून खाशेराव अल्पावधीतच स्वतःच्या पायावर तर उभे राहिलेच पण स्वास्थ्य लाभल्यावर त्यांनी अनेकांना उभे केले. अनेक मान्यवर व्यक्तींचा सहवास त्यांना लाभला, त्याचा त्यांनी योग्य उपयोग करून घेतला. अध्यात्माकडे वळून आता निर्मोही झालेल्या व्यक्तीचे हे आत्मकथन वाचनीय झाले आहे.

एक लेखक कसा घडत गेला, साहित्यिक म्हणून मानसन्मान मिळत असतानाच त्याची उपेक्षाही कशी होत होती आणि त्या साऱ्याचा व्यक्तिगत जीवनावर कसा परिणाम होत होता— ही सारी चित्रकहाणी दीपक घारे यांच्या 'चिं. त्र्यं. खानोलकर' या चरित्रपर पुस्तकात आली आहे.

'महाराष्ट्र रामायण' हे आनंद साधले यांचे रामायणातील खंडकाव्य. हा भाविकतेचा ग्रंथ नसून त्या सुंदर भावकथेचा साहित्यिक अंगाने रसास्वाद घेण्याचा प्रयत्न आहे. तर कालिदासाच्या मेघदूताने कविराज़ वसंत बापट यांनाही झपाटून टाकले आहे. या अलौकिक काव्यात त्यांना जे भाव ते त्यांनी 'मेघहृदय—' मध्ये सादर केले आहे. मूळ मेघदूताला उराउरी भेटून मिळणाऱ्या अनिर्वचनीय आनंदाची कल्पना, तसे भेटणे अशक्य असलेल्या सहृदय आस्वादकांना देण्याचा हा एक हृद्य प्रयत्न आहे.



अनुक्रमणिका

राजघाटावर जाऊन फुले वाहणे या मूळच्या सुंदर विधीचे राज्यकर्त्यांनी अगदी विडंबन करून टाकले या सद्य:स्थितीवरचा खेद व्यक्त करणारे काव्य आहे अरुण शेवते यांचे ' राजघाट.'

सुधीर मोघे यांच्या ' लय ' या काव्यसंग्रहातील कविता छोटया छोटया वाटत असल्या तरी त्यात जीवनाच्या प्रेम, निसर्ग इत्यादी सान्या छटा गुंफल्या आहेत. विशिष्ट वातावरणात मनाची तंद्री लागून या कविता झरझर उतरलेल्या आहेत. काव्याचा असाच अवीट आनंद देणारा, पानोपानी दाद द्यावीशी वाटणारा संग्रह आहे कवयित्री पद्मा यांचा ' श्रावणमेघ. '

वसंत आबाजी डहाके यांचा ' शुभवर्तमान ' काव्याची एक वेगळी वाट दाखवणारा संग्रह वाटतो तर दीर्घ कालावधीनंतर परत एकदा वाचकांसमोर आलेल्या कवयित्री निर्मला देशपांडे यांच्या काव्यसंग्रहाचे नावच आहे, ' हा छंद सुटत नाही '– कवियित्रीचे हे म्हणणे पटावे असेच यातील काव्य रमणीय आहे.

१९८८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मराठी ललित साहित्याचा हा धावता आढावा आहे. एवढीच पुस्तके यावर्षी प्रसिद्ध झालीत असे नाही परंतु काही मर्यादांमुळे सान्याच पुस्तकांचा उल्लेख करणे अशक्य ठरले आहे. असे करत असताना महत्त्वाची, आवर्जून दखल घ्यावीच अशी पुस्तके दृष्टिआड होणार नाही याची काळजी घेतलेली असली तरी तसे झालेच नसेल असे नाही, याची जाणीव आहे. ' पुस्तक काय आहे ' हे सांगण्याचाच उद्देश ठेवला असल्याने पुस्तकांवर भाष्य करण्याचे शक्यतो टाळले आहे–

तरीही उणेदुणे आढळल्यास क्षमस्व !

# परिषद–वार्ता

## ( १ नोव्हेंबर ते १९ जानेवारी )

गेल्या दोन अडीच महिन्यात परिषद आणि तिच्या काही शाखा यांच्या वतीने जे कार्यक्रम झाले त्यांचा संक्षिप्त वृत्तान्त येणेप्रमाणे–

**माधव ज्यूलियन स्मृतिदिन :** कविवर्य माधव ज्यूलियन यांच्या स्मृतिदिनी ( २९ नोव्हेंबर ) यंदा कवयित्री–संमेलन आयोजित केले होते. संमेलनात संजीवनी मराठे, विमल लिमये, अश्विनी धोंगडे, मंदा खांडगे, सरिता पदकी, संगीता जोशी, सौ. पटवर्धन, आसावरी काकडे आणि संचालिका डॉ. लीला दीक्षित यांनी भाग घेऊन कार्यक्रमात रंगत आणली.

**आहिताग्नि राजवाडे स्मृतिदिन :** महाराष्ट्रातील एक प्रकाण्ड पंडित आणि ओजस्वी प्रवचनकार आहिताग्नि कै. शं. रा. राजवाडे यांच्या स्मृतिदिनी ( २७ नोव्हेंबर ) डॉ. रा. शं. वाळिंबे यांचे ' राजवाडे : जीवन आणि कार्य ' या विषयावर प्रसंगोचित व्याख्यान झाले. स्मृतिदिनाच्या कायमच्या खर्चासाठी कै. राजवाडे यांचे नातू श्री. पु. रा. राजवाडे यांनी परिषदेला दहा हजार रु. ची देणगी दिली आहे.

**श्री. म. माटे स्मृतिदिन :** कै. श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांच्या स्मृत्यर्थ डॉ. वि. रा. करंदीकर यांची दि. २५ आणि २६ डिसेंबर रोजी दोन व्याख्याने झाली. ' माटे : जीवन आणि कार्य ' आणि ' संतसाहित्य : आजच्या संदर्भात ' हे दोन त्यांच्या व्याख्यानांचे विषय होते.

**का. र. मित्र व्याख्यानमाला :** ' मासिक मनोरंजन'कर्ते कै. का. र. मित्र यांच्या स्मरणार्थ दरवर्षीप्रमाणे यंदाही परिषदेने दहा व्याख्याने आयोजित केली होती. भारताच्या स्वातंत्र्यलढ्यात ज्यांनी विशेष भाग घेतला अशा काही थोरांच्या आत्मकथा हा यंदाच्या व्याख्यानमालेचा विषय होता. दि. ५ डिसेंबर ते १५ डिसेंबर या अवधीत प्रस्तुत मालेत पुढील दहा आत्मकथांवर व्याख्याने झाली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची आत्मकथा, संपादन–खरात ( भालचंद्र फडके ) पथिक, न. वि. गाडगीळ, (शं. ना. नवलगुंदकर ), कृष्णाकाठ, यशवंतराव चव्हाण ( ग. प्र. प्रधान ) मी एस्. एम. ( म. वि. गोखले ), माझी जीवनगाथा, गंगाधरराव देशपांडे ( बा. रं. सुंठणकर ) माझी जन्मठेप, सावरकर ( राम कापसे ) डोंगरीच्या तुरुंगातील १०१ दिवस, आगरकर ( विद्याधर गोखले ) हैद्राबाद

स्वातंत्र्यसंग्रामाच्या आठवणी, रामानंद तीर्थ (स. मा. गर्गे), जीवनप्रवाह, माधवराव बागल (शंकर पाटील), पण ऐकतं कोण, उषाताई डांगे (पुष्पा भावे)

**वि. द. घाटे स्मृतिदिन :** दि. १८ जानेवारीला कै. वि. द. घाटे यांच्या स्मृत्यर्थ श्री. मधुकर टिल्लू यांचा 'जिंदादिल अर्थात शेरोशायरी' हा मनोरंजक कार्यक्रम झाला.

**चिं. वि. जोशी स्मृतिदिन :** सुप्रसिद्ध विनोदी लेखक कै. चिं. वि. जोशी यांच्या स्मृत्यर्थ ठेवण्यात आलेले कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक (रु. १२००) यंदा प्रा. वसंत मिरासदार यांच्या 'हास्यत्रयोदशी' पुस्तकास देण्यात आले. या पुस्तकाचे प्रकाशक श्री. अशोक कोठावळे (मॅजेस्टिक प्रकाशन) यांनाही रु. ९०० चे पारितोषिक देण्यात आले. प्रस्तुत पारितोपिक-वितरण समारंभ १९ जानेवारीला प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते झाला. या प्रसंगी श्री. जोशी, लेखक प्रा. मिरासदार आणि परीक्षकांचे प्रतिनिधी या नात्याने प्राचार्य बाळ गाडगीळ यांची समयोचित भाषणे झाली. डॉ. म. वि. गोखले आणि डॉ. सौ. वीणा देव हे अन्य परीक्षक होते.

**कै. सरदार यांना श्रद्धांजली :** विख्यात विचारवंत साहित्यिक आणि अ. भा. साहित्य संमेलनाचे पूर्वाध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांचे २ डिसेंबर रोजी शोचनीय निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी ३ डिसेंबरला परिषदेने विशेष सभा आयोजित केली होती. प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत सर्वश्री बाबा आढाव, हे. वि. इनामदार, ह. श्री. शेणोलीकर, लक्ष्मण माने आणि गं. ना जोगळेकर यांची भाषणे झाली व अध्यक्षांचे भाषण झाल्यावर शेवटी श्रद्धांजली ठराव मांडण्यात आला.

**संमेलनाध्यक्ष श्री. शांताराम यांचा सत्कार :** अमरावती येथे भरणाऱ्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. के. ज. पुरोहित (शांताराम) यांचा परिषदेतर्फे पहिला प्रकट सत्कार ३ जानेवारीला प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आला. या प्रसंगी प्रा. विलास खोले आणि प्रा. भालचंद्र फडके या दोघा निकटवर्ती समीक्षकांची भाषणे झाली. प्रा. प्रधान यांनी श्रीफळ व शाल देऊन श्री. शांताराम यांचा सत्कार केला. याप्रसंगी पुण्यातील साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, रवींद्र कुलकर्णी, प्रा. वसंत मिरासदार, इत्यादी संस्था व व्यक्तींतर्फेही श्री. शांताराम यांना पुष्पगुच्छ देण्यात आले.

**मॉरिशस कार्यकर्त्यांची भेट :** मॉरिशसमधील मराठी साहित्य परिषदेचे कार्यकर्ते श्री. देवजी पाडिया (अध्यक्ष) आणि श्री. होमराजन गौरिया (उपाध्यक्ष) यांनी ४ जानेवारी रोजी दुपारी परिषदेला भेट दिली. याप्रसंगी परिषदेचे पदाधिकारी, काही निमंत्रित आणि पत्रकार उपस्थित होते. परिषदेचे कार्यवाह

प्रा. गं. ना. जोगळेकर यांनी उपस्थितांची ओळख करून दिल्यावर कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र वनहट्टी यांनी पाहुण्यांचे स्वागत केले व त्यांना परिषदेची माहिती देऊन सर्वतोपरी सहकार्य देण्याचे आश्वासन दिले. श्री. पांडिया आणि गौरिया यांनी मॉरिशसमधील मराठी बांधवांच्या एकूण परिस्थितीची सर्वांना माहिती सांगितली. संमेलनाध्यक्ष श्री. शांताराम, अनंतराव कुलकर्णी, प्र. ल. गावडे, हे. वि. इनामदार, शंकर सारडा इत्यादींबरोबर प्रश्नोत्तरे झाल्यावर प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते पाहुण्यांचा सत्कार करण्यात आला.

**दिवाळी अंक स्पर्धा :** १९८८ मधील दिवाळी अंकांपैकी तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांची पूर्वप्रथेनुसार यंदा निवड करण्यात आली व त्यांच्या संपादकांना प्रत्येकी रु. १०१ चा पुरस्कार देण्यात आला. निवडलेले अंक येणेप्रमाणे— 'श्रीवत्स' : संपादक राम शेवाळकर, 'घरदार' : संपादक ह. मो. मराठे, 'मराठवाडा' : संपादक पन्नालाल सुराणा आणि यदुनाथ थत्ते. प्रस्तुत तीन पुरस्कार अनुक्रमे विविधज्ञान-विस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर, मासिक मनोरंजन-कर्ते का. र. मित्र आणि किर्लोस्कर मासिकाचे कै. शं. वा. किर्लोस्कर यांच्या स्मृत्यर्थ देण्यात आले. या पुरस्कारांबरोबरच दिवाळी अंकांमधील उत्कृष्ट ललित-लेखास कै. प्रा. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २०० चा पुरस्कार श्रीमती मंगला गोडबोले यांना ( लेखाचे नाव 'निरोप' – माहेर दिवाळी अंक ) यांना देण्यात आला. या सर्व पुरस्कारांची निवड करण्यासाठी सर्वस्वी राजेंद्र वनहट्टी, म. श्री. दीक्षित, गं. ना. जोगळेकर आणि राजा फडणीस ( निमंत्रक ) यांची समिती नियुक्त करण्यात आली होती.

**कार्यालयीन कामकाज :** परिषदेच्या एक स्थानिक कार्यवाह श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांनी कार्यवाहपदाचा राजीनामा दिल्यामुळे त्यांच्या जागी श्री. राजा फडणीस यांची निवड करण्यात आली. घटना दुरुस्ती समितीच्या पहिल्या बैठकीत काही नियमात दुरुस्त्या सुचविण्यात आल्या. जूनअखेर समिती दुरुस्त खर्डा कार्यकारी मंडळाला सादर करील. परिषदेच्या नव्या वास्तुविस्तार समितीच्या पहिल्या बैठकीत जागा मिळविण्याबाबत मा. जिल्हाधिकाऱ्यांशी प्राथमिक बोलणी करण्याचा अधिकार श्री. शंकर पाटील यांना देण्यात आला.

**शाखासभांचे कार्य :** परिषदेच्या काही शाखांकडून जे वृत्त आले ते संक्षेपाने येणेप्रमाणे – **ठाणे** : २४ ऑगस्टच्या श्री. स. बा. यशवंत यांचे 'कहाणी टोपण नावाची' या विषयावर व्याख्यान. २६ सप्टेंबरला शाखेचे दिवंगत ज्येष्ठ धुरीण प्रा. म. वि. फाटक यांचा पहिला स्मृतीदिन. त्याप्रसंगी 'म. वि. फाटक स्मृतिसुगंध' ग्रंथाचे श्री. म. द. नाडकर्णी यांच्या हस्ते प्रकाशन आणि प्रा. म. ना. अदवंत, मुरलीधर सायनेकर, वि. ह. भूमकर, आशा साठे यांची भाषणे. कार्यक्रमाच्या

उत्तरार्धात गिरिजा कीर यांचे 'मला भेटलेली माणसे' या विषयावर व्याख्यान. **धुळे :** ऑक्टोबर महिन्यात नवरात्र व्याख्यानमालेचे आयोजन. १४ रोजी प्रा. ग. प्र. प्रधान यांनी मालेचे उद्घाटन केले आणि 'साहित्य व सामाजिक बांधिलकी' या विषयावर विचार प्रदर्शित केले. शाखेतर्फे श्री. प्रधान यांचा प्रा. कुसुमाकर शिपी यांच्या हस्ते श्रीफल व शाल देऊन सत्कार. १५ रोजी प्रा. भगवंतराव देशमुख यांचे 'नाथांची भारूडे' या विषयावर व्याख्यान आणि नंतर श्रीमती सुशील पगारिया, शरद छापेकर इ. चे कविसंमेलन. **इचलकरंजी :** शाखेने साप्ताहिक बैठकीचा नवा उपक्रम सुरू केला. ऑगस्ट महिन्यात रमेश भिवरे, शरद बेडेकर यांच्या अशोक दास यांनी मुलाखती घेतल्या. आ. क. कुरूंदवाडे यांनी कथालेखनातील आपले अनुभव कथन केले. २१ ऑगस्टला प्रा. चंद्रकुमार नलगे यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. ग. प्र प्रधान यांची वामन काळे आणि वैजनाथ महाजन यांनी प्रकट मुलाखत घेतली. **कोल्हापूर :** परिषदेच्या 'गणेश–सरस्वती ठाकूरदेसाई' व्याख्यानमालेपैकी एक व्याख्यान शाखेने आयोजित केले. ३० सप्टेंबरला डॉ. बापूजी संकपाळ यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. व्यं. वि द्रवीड यांचे 'संतवाङ्मया' वर व्याख्यान झाले. **अहमदनगर :** २१ डिसेंबरला प्रा. ह. कि. तोडमल यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. गं. वा. सरदार यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. याप्रसंगी भास्करराव जाधव, गं. ना. मोरजे, सौ. कवडे यांची भाषणे झाली. २४ डिसेंबरला सानेगुरुजी जयंतीनिमित्त महावीर जोंधळे, जयंतकुमार त्रिभुवन इ. ची. भाषणे झाली.

**एक देणगी :** पुण्याच्या नातू फौंडेशन (पब्लिक चॅरिटेबल ट्रस्ट) तर्फे परिषदेला नुकतीच रु. १०,००० (दहा हजार रु.) ची देणगी मिळाली आहे. या देणगीवरील व्याजाच्या रकमेतून दरवर्षी कै. श्रीमंत रा. ना. नातू यांचे नावे रु. ७५० चा ग्रंथपुरस्कार देण्यात यावयाचा आहे. (अधिक तपशील पुढील अंकी दिला जाईल.)

**राजा फडणीस** | **गं. ना. जोगळेकर** कार्यवाह | **चिं. शं. जोशी**

# आपण विक्रमी वाचक होणार ?

## नव्या पुस्तकांच्या वाचनास चालना मिळण्यासाठी अभिनव स्पर्धा

—शंकर सारडा

सप्टेंबर १९८८ अखेर प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांपैकी काही लक्षवेधक यादी म. सा. पत्रिकेच्या दिवाळी अंकात दिलेली होती. त्यानंतर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा समावेश केलेली यादी पुढे देत आहे. ही यादी अपूर्ण आहे. स्थलाभावी वा वेळीच हाती न आलेली अनेक पुस्तके या यादीतून गळली आहेत. पुण्याच्या मॅजेस्टिक बुक स्टॉलचे रवी व सुरेश कोठावळे यांनी सहकार्य दिल्यामुळे या यादीतील बहुसंख्य पुस्तके प्रत्यक्ष पाहणे सुलभ झाले. वाचनालये, ग्रंथालये, वाचक व अभ्यासक यांना या यादीमुळे ताजी पुस्तके निवडणे सोयीचे होईल. दरवर्षी बाजारात येणाऱ्या पुस्तकांचा मागोवा घेण्याच्या दृष्टीने अशा सूचीला संदर्भमूल्यही असते.

या यादीतील शंभरावर पुस्तके ज्यांनी वाचली आहेत अशा वाचकांचा ८८ चे विक्रमी वाचकवीर' म्हणून आम्ही साहित्य परिषदेतर्फे २७ मे रोजी होणाऱ्या परिषदेच्या वर्धापन दिन समारंभात गौरव करणार आहो.

या स्पर्धेत सहभागी होणाऱ्यांनी आपली नावे व वाचलेल्या पुस्तकांची यादी कळवावी. त्यांनी ती पुस्तके खरोखरच वाचली आहेत की नाही हे पारखून घेण्यासाठी आम्ही एक प्रश्नावली पाठवू. तिची उत्तरे अचूक असणाऱ्यांचा प्रशस्तिपत्रे देऊन गौरव करू. त्यांपैकी सर्वाधिक विक्रमी वाचकवीराला पुरस्कारही देऊ. मात्र याबाबत परिषदेचा निर्णय अंतिम राहील. १ एप्रिलपर्यंत वाचकांनी म. सा. परिषदेकडे यासाठी नावे पाठवावी.

— कादंबऱ्या —

एकलव्य —शरद दळवी
वृत्तांत —श्री. ज. जोशी
बॉनसॉय —सुभाष भेंडे
मार्केट — ह. मो. मराठे
अलकनंदा —सुरेश द्वादशीवार
वैभवी वास्तूला काटेरी खांब —मंदाकिनी अष्टेकर
चक्रव्यूह —जनार्दन ओक
सलामी —प्रकाश कदम
अश्वमेघ, मधुरा —अनिल आठल्ये
अभिसारिका, अपराजिता —शैला कामत
वारस —वैजयंती काळे
मानसहंस — वि. म. कुलकर्णी
ती बाई —द. रा. जवाहिरे

विसरशील खास मला, ऋेझ –जाईल
पाताळयंत्री, अधिकार –अशोक थोरे
नेमानेम –स्नेहलता दसनूरकर
शुभ्रखंडाचे सम्राट –मालती देशपांडे
आनंदाचे झाड – शं. ना. नवरे
परिक्रमा –देवदत्त पाटील
टोकियो टॉवरवरून –पांढरीपांडे
मेड इन इंडिया –पुरुषोत्तम बोरकर
चक्रव्यूह –व. सु. भगत
चूक माझीच आहे –राजा राजवाडे
पाण्याखाली अंधार –चिंतामणी लागू
रेशीम काटे, शलाका, कारण –सुरेश वैद्य
यमुना –आनंद हांडे
भेटेन पुन्हा –रघुवीर सामंत
आपलं घर –वैजयंती काळे
आशाळभूत –चांगदेव काळे
उजेडाची ओढ –स्नेहसुधा कुलकर्णी
फरारी, गजरी, चावरतिडा, सामना
–व. वा. बोधे
दैवाचे फासे, चिनार, निष्पाप वळी
–बाबा कदम
चैत्री, कमळा, वंचना –मामा साठे
वे दुणे पाच –नयनतारा देसाई
बंदिस्त –नवजीत देशमुख
मदनिका –यशवंत पाध्ये
मेघमल्हार –सुमती क्षेत्रमाडे
यज्ञ –राम शिर्के
शमा –किरण आचार्य
शीतयुद्ध –श्याम मनोहर
स्वामी महाराज –नयना आचार्य
काचघर –चारुशीला गुप्ते
डॅशिंग –सुभाष शहा
भंडारभोग –राजन गवस
शिल्पी –संजय सोनवणे
हॉटेल –अशोक पाध्ये
अपराजिता –कुंभार
आवर्त –गोपाळ वेळगावकर
आधार –गोविंद केळकर
एका कोळियाने –अरुण हेवळेकर
कागदी सिंह –रमेश मंत्री
सन्मान, ताळमेळ, कृतार्थ –शैलजा राजे
खाई –उत्तम बंडू तुपे
दळी –हेमंत सावंत
नक्षत्र –रेणू देशपांडे
शिकार –सुधा मराठे
विस्मृती, देवता, दूरदूर, श्रद्धा
–प्रतिभा रायकर
सूर तूच छेडता –मालती लोहार
संघर्ष –रघुवीरसिंह रजपूत
घुसमट –भीमसेन देठे
ज्वलन –शंकर इनामदार
परिमला –केशव केळकर
लावण्यवती –माधव कानिटकर
जयपराजय –जयश्री रुईकर
दिक्‌बंधन –अरुण ताम्हनकर
पराक्रम –व्यंकटेश महाजन
प्रतिबिंब –रजनी शिरोडकर
भातुकली आणि घरटे –जोशी–लिमये
युगावतार –प्र. ग. सहस्रबुद्धे
रत्नप्रभा –जयंत रानडे
शिकार –निवृत्ती मुळीक
सलामी, अश्वमेध –अशोक व्हटकर
कर्मगती –अरुण गडकरी
कालचक्र –विनायक डंके
वेताळ, टिटवी –व. बा. बोधे
देहदास –देवदत्त पाटील
प्रेम –पद्माकर गोवईकर
बारामाशी –शरणकुमार लिंबाळे

भरपाई —चंद्रकांत भोगटे
मिटल्या पापण्या —पुरुषोत्तम बावकर
वळणावर —वैजयंती काळे
वैदेही —आनंद साधले
सूडसंभ्रम —यशवंत रांजणकर
विलक्षण —सुभाष शहा
ब्लॅकमेल —शशिकांत मेहता
आंदोलन —दिनानाथ मनोहर
आक्रांत —सुबोध जावडेकर
गिऱ्हाण —भीमसेन देठे
डगाळलेला चंद्रमा —सुमती क्षेत्रमाडे
ऊर्मिला —माया साठे
ओळख, राघू मैना —आशू रावजी
दिनू कानडे
नजमा कांबळे —गोरख भालेराव
प्रबुद्ध —भा. द. खेर
बेनाम —शरच्चंद्र वाळिंबे
समाधी —चिंतामणी लागू
मेसेज —अशोक थोरे
कुंठित —सुहास शिरवळकर
क्षमा —प्रभाकर दिघे
गद्दार —जयंत रानडे
रुपाली —शं. ना. पाटील
तीन पानी डाव —विनायक राजगुरू
एकच स्पर्श —पद्मा कुलकर्णी
शंकी —अशोक गोडबोले
स्वरगंगेच्या काठी —सुमती गांधी
महापूर —जयवंत काकडे
थेंब थेंब मृत्यू —संजय सोनावणे
विस्तवाशी खेळायचंय मला
—भाऊ बाविस्कर
पानिपत —विश्वास पाटील
महाराणी पद्मिनी —रघुवीर राजपूत
स्वप्न संदेश —पद्मा कुलकर्णी
बाप से बेटा —भरत पाटील
दुसरा डाव —वैजयंती काळे
कधी कधी —सुरेश वैद्य
आवर्तन —हृषिकेश परांजपे
कळासी —उत्तम बंडू तुपे
एकलीच दीपकळी —शशिकांत देशपांडे
टेरर —प्रकाश कदम
लेपर —पी. जी. कुलकर्णी
ऐसपैस —हृषिकेश परांजपे
गंध सुगंध —प्रज्ञा तपस्वी
काममात्र —गोविंद मुसळे

— कथा —

मृत्यूचं थैमान —बा. सी. अष्टेकर
पत्नी, प्रेयसी, प्रतिभा, अथक
—अरविंद गोखले
आम्ही पेन्शनीत निघतो —चं. जोगळेकर
चटक —स्नेहलता दसनूरकर
निरगाठी आणि चंद्रिकेत —गौरी देशपांडे
मॉस्कोच्या बुरूजावरून —पिंपळखरे
पाषाण —पु. भा. भावे
वृंदावन —शैलजा राजे
शल्य —रघुवीर राजपूत
सुखदु:ख, प्रेमाची दंगल —राजा राजवाडे
विनोदी द्वादशी —वसंत सबनीस
सपन —सोपान हाळमकर
अनिरुद्ध —मनोहर शहाणे
कॉम्रेड —मधुकर वडवणे
काळोखगर्भ —के. व्ही. सरवदे
पहाट —सुखराव हिवराळे
राजधानी —नागनाथ कोत्तापल्ले
श्रावण —योगिनी जोगळेकर
अति झालं, हसू आलं —रमेश मंत्री
कृष्ण जन्म —राजेंद्र बनहट्टी

प्राण्यांचे जग –निरंजन घाटे
अश्रद्ध –वसुधा पाटील
तथास्तु–हरिहर आठल्येकर
सायकेडेलिया –अनिरुद्ध वनहट्टी
हुलकावणी –रमेश मंत्री
ओझं –गो. मा. पवार
प्रस्थान –ज्ञानेश्वर नाडकर्णी
लक्ष्मीसेतू –गो. नी. दांडेकर
अखेरचे पर्व –विजया राजाध्यक्ष
प्राजक्त, पाकळ्या –प्रभा वैंकर
मळभ –वसंत कुलकर्णी
सर्वोत्कृष्ट शन्ना –शं. ना. नवरे
अवेळ –विजया वाड
आनंदाचे डोही –मंदाकिनी अष्टीकर
कुंकवाचं देणं–घेणं –जयश्री खरोटे
गाजराची पुंगी –पंढरीनाथ रेगे
देवचार –पुरुषोत्तम वावकर
पहिला पाऊस –खंडू अढांगळे
वनाटी –रमण माळवदे
भगेल भित –रणसिंग
मावळतीची झाडे –जयश्री थत्ते–भट
मातरं–गंगाधर ठाणगे
सांजरात –जयवंत दळवी
डोहकाळिमा –जी. ए. कुलकर्णी
काही मनातलं –विजया जहागीरदार
दिवेलागणी –पद्मजा फाटक
अनुभव –श्रीकांत कार्लेकर
हर्ष– अनंत गुरव
मरणमाळा –केशव मेश्राम
भोगशिळा –दसनूरकर
देणगी –योगिनी जोगळेकर

**चरित्र–आत्मचरित्र**

नाच ग घुमा –माधवी देसाई
मागे वळून –मथूताई आठल्ये
वडवानल –वि. श्री. जोशी
सांगण्याजोगे –शांताबाई गुलाबचंद
तो राजहंस एक –बाळ सामंत
वणवा हिंद देशीचा –वि. श्री. जोशी
सर्पतज्ज्ञ रेमंड –वीण गवाणकर
कॉम्रेड्स्, लीस सालम –जयंत प्रधान
जीवनव्रती दाजीसाहेब –सतीश तराळ
माझी शिपाईगिरी –एस. पी. पी. थोरात
एका गायकाचा ताळेबंद –देशपांडे
माझेश्वरी –वसंत सवनीस
रामशास्त्री– चरित्र व पत्रे
–सदाशिव आठवले
माणसे –अरभाट व चिल्लर
–जी. ए. कुलकर्णी
स्वरसंगम –अरविंद गजेंद्रगडकर
डॉ. काशिनाथ घाणेकर–चारुशीला ओक
वडिलांच्या सेवेसी –शिरीष पै
वालींग –श्याम चव्हाण
थोर वाल सन्मित्र –पां. ना. मिसाळ
–दत्तू गोरे
शाहीर माडगूळकर –मंगळवेढेकर
कल्याणी –नरुभाऊ लिमये

**काव्य**

मॉस्कोतील कविता –बापूराव जगताप
शुभवर्तमान –डहाळे
औदुंबर –प्रफुल्लदत्त
प्रार्थना –फ· मुं. शिंदे
स्त्री सूक्त –अश्विनी धोंगडे
अस्तित्व –सीताराम गिरप
महाराष्ट्र रामायण –आनंद साघले
राजघाट –अरुण घोवते
इंटरव्ह्यू –जगन्नाथ गवळे










अनुक्रमणिका

मर्डर लॅन्ड –सोनावणे
स्पर्शिका –सुलभा कोरे
हा छंद सुटत नाही –निर्मला देशपांडे
भिल्लांची गाणी –डॉ. सुदाम जाधव
मेघहृदय –वसंत वापट
शिंग फुंकले रणी –वसंत वापट
मला उमजलेले अल्लादियाखां
–स्वामी धर्मव्रत
अशी मने असे नमुने –शिवाजी सावंत
साऱ्या गुलाब वाटा –गिरिबाल
स्वस्तिका –वा. ज्यो. देशपांडे
शूर मर्दाचा पोवाडा –वसंत वापट
वाभळीचे वन –प्रभाकर जोगळेकर

### नाटक–एकांकिका

डॉ. हुद्दार –श्री. ना. पेंडसे
वाटली, वाई आणि मंडळी –खरात
सायरन –श्याम य. जोशी
आणि एकदा गंमतच झाली
–विजय मोंडकर
एक मेलेलं पोस्ट –मोंडकर
कालचक्र –जयवंत दळवी
मामका: पाण्डवाश्चैव –गो. पु. देशपांडे
डवल गेम –सुरेश जयराम
वाटा–पळवाटा –दत्ता भगत
कारान –तुपार भद्रे
गडवड नगरीचा झोपाळू राजा–कुलकर्णी
सूर्यफूल जगे अंधारी –वसंत लोंढे
विठो रखुमाय –रत्नाकर मतकरी
पांडगो इलो रे वा इलो –प्र. ल. मयेकर
म्हाराज मेलो –दिलीप परदेशी
निराधार –रमाकांत पायाजी
देवता –मनोहर ववलपोळे
व्यंकोजी –गणेश हिर्लेकर
गजरा चमेलीचा –लक्ष्मीपुत्र लक्ष्मण
कालचक्र –जयवंत दळवी

### समीक्षा

अश्वत्याची सळसळ –नाडकर्णी
जमलेली पानं –शुभदा शेळके
वाल्मीकी रामायण –लालचंद हिराचंद
स्वप्नगात्री शांता शेळके –स. ग. यादव
रायगडाला जेव्हा जाग येते
–देशपांडे (संपादक)
आशय आणि आविष्कार –प्रल्हाद वडेर
रसमयी –दुर्गा भागवत
मघाळलेल्या संध्याकाळी
–बॅ. सुनीती पुंगलिया
समर्थ साहित्यातील आकृतिबंध
–उपा जोशी
रंगनायक –राजीव नाईक
संहिता, समीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा
–वसंत दावतर
बॅरिस्टर–तीन रूपे –दादेगावकर
हिरव्या चादरीवर –वा. य. गाडगीळ
मराठी लावणी/निर्मिती व स्वरूप
–पी. जी गायकवाड
अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र
–शरद पाटील
शतपावली –भास्कर नंदनवार
साहित्यिकांच्या गमती–जमती –राठौर
रससूत्र, वाटचाल –नरहर कुरुंदकर
साहित्य-वांधिलकी आणि विद्रोह
–यशवंत मनोहर
गझल : रंग आणि गंध –हिरेमठ
आणि म्हणूनच –चंद्रकांत पाटील
माध्यम समीक्षा –धारुरकर
कृष्णचंदन –धनंजय आचार्य











रंगयात्रा, मराठी नाटक आणि रंगभूमी
—वि. भा. देशपांडे
नाट्याभिनय आणि संवाद
—दीनानाथ टाकळकर
नाट्यविचार —डॉ. अनंत देशमुख
पोत आणि पदर —प्र. ई. सोनकांबळे
पूर्वेची प्रभा —राम शेवाळकर
इतिहास आणि कल्पित
—सेतु माधवराव पगडी
समर्थ रामदास —तुकडोजी —राम धांडे

## ललित/इतर

साहित्यातून सत्याकडे —तेंडुलकर—पै
गद्धेपंचविशी —डॉ. आनंद नाडकर्णी
विरंगुळा —प्रमोद नवलकर
हास्य कॉर्नर —विवेक मेहेत्रे
वाटा तुझ्या माझ्या —कुरुंदकर
आनंदयात्रा, निसर्गयात्रा, संसारयात्रा,
अक्षरयात्रा —ग. वा. वेहेरे
सोवतचे पहिले पान (४ खंड)
ग. वा. वेहेरे
बुवाबाजी-वळी स्त्रियांचा —श्याम मानव
पाऊले चालती —रमेश सहस्रबुद्धे
देशाचे वाटोळे करणारी मनोवृत्ती
—सूर्यवंशी
पहाट वारे —दादा धर्माधिकारी
वदलते जीवन —इंदुमती सुखात्मे
१४ पत्रे — ज. वा. कुलकर्णी
झुंबडशाहीचे बंड —सुंठणकर
तुम्ही आणि कायदा —सुप्रिया सरवटे
विज्ञानप्रणीत समाजरचना —सहस्रबुद्धे
सावरकरांचा बुद्धिवाद —शेषराव मोरे
संस्कार आणि कुळाचार —खाडिलकर
लोलक —पु. रा. वेहेरे

शोध भानामतीचा —श्याम मानव
वॅम्वी —वसंत निगवेकर
रंगनायक —सं. राजीव नाईक
मुले आणि व्यंग —संभाजी घाटे
महा. जातिसंस्थाविषयक विचार
—सं. सुमंत, पुंडे
पुरुषराज अळूरपांडे – पु. ल. देशपांडे
भाषा विज्ञान परिचय—डॉ. स. गं. मालशे
रसिक मित्र हो —वसंत कानेटकर
गजल दर्पण —विनय वाईकर
गोखले नवदर्शन —मु. गो. देशपांडे
मराठी नाट्यसंगीत —बाळ सामंत
भारतीय संस्कृतीचा विश्वसंचार—
—हेवाळकर
भारतीय स्वातंत्र्य संग्राम —लीला आवटे
स्वातंत्र्य संग्रामाचे महाभारत -
—ग. प्र. प्रधान
महाराष्ट्राची शोकांतिका —अरुण सारथी
माझा नाट्यलेखन/दिग्दर्शनाचा प्रवास
—सं. वि. भा. देशपांडे
वास्तव आणि दृष्टिक्षेप —ठोके
हिंद तेजा, जाग रे —भिशीकर
हैद्रावादचा पहिला सत्याग्रह —परळीकर
सोमनाथ ते सावरमती —रमेश मंत्री
वैभवाचे दिवस —रमेश मंत्री
ओलांडताना —लीला पाटील
चंदेरी चित्रहार —रा. ग. जाधव
डायऱ्यातील टिपणे —वा. ल. कुलकर्णी
शिवाजीराव भोसले —प्र. ना. दीक्षित
रामकृष्णांचे कोडे —दुर्गा भागवत
वऱ्हाडी मंडळी —मधुकर केचे
संसदेची सप्तपदी —मो. ग. तपस्वी
श्रीकृष्णचरित्र —रा. चिं. ढेरे
तरंग —श्याम कुरळे

अनुक्रमणिका

पाण्याचे पंख –श्रीनिवास कुलकर्णी
दीपमाळ –विद्याधर गोखले
अंगणातलं चांदणं –रवींद्र पिंगे
चेरी ब्लॉसम –अंजली कीर्तने
सफर –मंगला साठे
साहित्य संमेलनाचे महाभारत
–भीमराव कुलकर्णी
मनोविकारांचा मागोवा –श्रीकांत जोशी
आरोग्याचा अर्थ –डॉ. नाडकर्णी
घनचक्करची दुनिया –यशवंत पाध्ये
ऐलमा पैलमा –लीला पाटील
धर्म, शासन आणि समाज
–नलिनी पंडित
मोहनचं स्टडी सर्कल –माडीवाले
पुनर्जन्म –एक शोध –बाळ सामंत
आंबेडकरांचे विरोधक –हेरलेकर
सांस्कृतिक संचित –वि. रा. करंदीकर
आरसपानी –सदा डुंवरे
आभाळवेडी –श्रीकांत तिडवे
प्रस्तावनाकार चव्हाण –दिनकर पाटील
स्पेशल रिपोर्ट –अरुण ताम्हणकर
चौफेर –माधव गडकरी
परिक्रमा –लता राजे
भटक्याचे लग्न –उत्तम कांबळे
वाईमाणूस –सरोजा परुळकर
पोलिसातील माणूस –गजानन टाकळे
अमेरिकनांच्या अंतरंगात –कशाळीकर
आपली स्वप्ने –गुरसाळे
उमलत्या कळ्यांचे प्रश्न –विठ्ठल प्रभू
धर्म आणि राजकारण –अरुण शौरी
निसर्गशिल्प –गो. नी. दांडेकर
रूपेरी पडदा : तंत्र मंत्र
–दिनकर पाटील
आजचा महाराष्ट्र
–सं. बेडकीहाळ–सुराणा
अंधश्रद्धा–प्रश्नचिन्ह –दाभोळकर-आर्डे
रानवा –प्रकाश गोळे
भाराभार गवत –भा. रा. भागवत
हास्यत्रयोदशी –वसंत मिरासदार

□

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



( पान १६ वरून )

'तुमची सर्वांत रेंगाळलेली कथा कुठली ?'

'या प्रश्नाचे उत्तर देण्याआधी सगळ्यांत झटपट लिहून झालेली कथा कुठली या प्रश्नाचे उत्तर द्यायला मला आवडेल.'

'ठीक आहे. झटपट लिहून झालेल्या कथेचे नाव सांगा.'

'खार आणि शिंगे या दोन कथा एका झटक्यात लिहून झाल्या आणि सर्वांत रेंगाळलेली कथा म्हणून परागंदा आणि धूळ यांची नावे सांगता येतील.'

'लिहायची तुमची वेळ कुठली असते ?'

'साधारणतः रात्री ११॥ नंतर. सगळे झोपल्यावर. गमतीने सांगायचे तर मी चोरून लिहितो. पलंगावर बसून.'

'किती वेळ बसता ?'

'दोन तीन तास.'

'कथा लिहिल्यावर काय वाटते ?'

'प्रचंड मानसिक थकवा जाणवतो.'

'दिवाळी अंकांची मागणी आली तर पुरवठा वाढवता का ?'

'नाही. मागणीमुळे लिहून होतेच असे नाही. वर्षाला चार-सहा कथा मी लिहितो. त्या माझ्या सवडीने, सोयीने लिहितो. मागणीप्रमाणे पुरवठा मला जमत नाही.'

## पहिली वाचक – पत्नी

'कथा लिहून झाल्यावर कुणाला वाचायला देता का ?'

'कथा लिहून झाल्यावर माझी पत्नी वाचते. ती बऱ्यापैकी वाचते. नवऱ्याने लिहिलेय म्हणून कौतुकच करायला हवे असे आमच्या घरातले वातावरण नाही. ती जर बोलली नाही तर मी समजतो– ही कथा तितकीशी जमली नसावी. परंतु मी ती पुन्हा लिहितो व दुरुस्त करतो असे मात्र नाही.'

'वाचकांची पत्रे येतात ?'

'येतात ना ! आरंभीच्या कथा वाचून वामन चोरघडे, हरिभाऊ मोटे माझी चौकशी करीत. स्वतःचे शरीर नावाची नर्सच्या जीवनावरील कथा मी लिहिली होती. त्या कथेवर बरीच पत्रे आली आणि ती शिवराळ होती.'

'मराठीतील तुमची आवडती काही पुस्तके सांगा.'

'स्मृतिचित्रे, बहिणाईची गाणी, गोतावळा, रणांगण, वनगरवाडी, बळी, मर्ढेकरांच्या कविता.'



अनुक्रमणिका

'तुमच्या जीवनातील वाङ्मयीन ऋणानुबंध जुळलेल्या व्यक्ती कोणत्या ?'

'पु. भा. भावे, आ. रा. देशपांडे, गोविंदराव दोडके, पु. ल. देशपांडे.'

## मराठी समीक्षा अपुरी

'तुम्ही इंग्लिशचे प्राध्यापक. इंग्रजीतील समीक्षेच्या तुलनेने मराठी समीक्षा अजूनही प्राथमिक अवस्थेत आहे असे तुम्हाला वाटते का ? मराठीत विशिष्ट वाङ्मयीन संकल्पना, वाङ्मयीन प्रवृत्ती, निर्मितिप्रक्रिया–विशेष यांच्यावर स्वयंपूर्ण सलग समीक्षात्मक ग्रंथही फारसे नाहीत. असे का ?'

'तुम्ही म्हणता ते खरे आहे. रा. भा. पाटणकर, प्रभाकर पाध्ये, म. सु. पाटील, गंगाधर पाटील, य. दि. फडके, सुधीर रसाळ वगैरे काही अपवाद सोडले तर समीक्षा लेखन हे फुटकळ व प्रासंगिकच आहे असे दिसते. वृत्तपत्रीय अभिप्रायही हे तर वरवरचेच असतात. अपुरेच असतात.'

'विद्यमान वाङ्मयीन वातावरण कसे वाटते ?'

'असमाधानकारक. पुस्तकांच्या व्यवसायाला ज्याप्रकारे शासनाचे सहाय्य हवे ते आज उपलब्ध नाही. पुस्तके स्वस्त व्हायला हवीत. सर्वदूर जायला हवीत.'

## पुस्तकांना भवितव्य नाही

'मराठीबद्दलची अनास्था दूर कशी होईल ?'

'इंग्रजीचा वापर कमी केला तरच ही अनास्था दूर होईल.'

'मराठीला भवितव्य आहे का ?

'संस्कृतीचे वाहन म्हणून भवितव्य आहेच. दूरदर्शन, व्हिडिओ यांचे नवेपण ओसरेपर्यंत तरी मराठी पुस्तकांना भवितव्य नाही.'

'१९८८ मधले कुठले पुस्तक आवडले ?'

'सलमान रश्दीचे सॅटॅनिक व्हर्सेस हे.'

'तुम्हाला हे पुस्तक कसे मिळाले ? सरकारने त्याच्यावर बंदी घातलीय ना ? बंदी घालण्यासारखे ते आहे असे वाटते का ?'

'बंदी घालण्याचे खरे तर काहीही कारण नाही. एक तर ते जेम्स जॉइसच्या युलिसिससारखे समजायला अवघड आहे. सलमान रश्दी हा समजायला कठीण लेखक आहे. तो तिरकस उपरोधिक लिहितो. विशिष्ट भूमिका घेऊन लिहितो. ज्याला तो वाचून समजेल त्याच्यावर त्याचा काही विपरीत परिणाम होणार नाही. बंदी घालणे गैर याचे दुसरे कारण असे की ललित लेखकाला अधिकाधिक स्वातंत्र्य हवे असे मला वाटते. ते स्वातंत्र्य नसेल तर तो लिहूच शकणार नाही.'



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



